


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५२ । अंक ६ । **मार्च १९९९**
फाल्गुन-चैत्र, शके १९२०
किंमत रु. ३०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३.(जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन



अनुक्रमणिका

# धर्मपालन, धर्मप्रसार व धर्मांतर यांचे स्वातंत्र्य

धर्मपालन, धर्मप्रसार व धर्मांतर यांचे स्वातंत्र्य हे व्यक्तीला प्रदान केलेल्या मूलभूत हक्क व स्वातंत्र्ये यांचा एक अंगभूत भाग आहे. तत्त्वतः ही गोष्ट कोणी सामान्यपणे सहसा अमान्य करीत नाही; करणे अवघडही आहे. पण व्यवहारात धर्मांतराविषयी बातम्या वर्तमानपत्रांमधून येतात तेव्हा अनेकांची खोलवरची प्रतिक्रिया एक तर कृतकृत्यतेची वा अस्वस्थतेची असते. क्वचित कोठे कोणी एकट्या व्यक्तीने धर्म बदलला असे नाही; अमूक धर्मामधून लोक तमूक धर्मात प्रवेश करण्याचा कल वा प्रवाह आढळतो आहे, अशी छाप जर मनावर उमटली तर, प्रतिक्रिया टोकाच्या होतात, असा अनुभव येतो.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, 'मी हिंदू म्हणून जन्माला आलो असलो तरी हिंदू म्हणून मरणार नाही' असे घोषित केले तेव्हा मोठी खळबळ माजली. कारण, ते आपल्या अनुयायांनाही कोणत्या तरी अन्य धर्मात घेऊन जाणार ही गोष्ट स्पष्ट दिसत होती. प्रत्यक्षात तसे घडलेही. त्यांना अनुसरून लाखो लोकांनी बौद्ध धम्माची दीक्षा सामूहिकपणे घेतली. तेवढ्या मोठ्या प्रमाणावर समारंभपूर्वक धर्मांतर केल्याची घटना नंतरच्या ४०-४२ वर्षांत घडलेली नाही. आजही हिंदू असण्याचा अभिमान बाळगणाऱ्या मंडळींच्या मनात एक खंत, एक गाऱ्हाणे व एक दुरावा अनुभवायला मिळतो. 'बौद्ध म्हणजे तसे हिंदूच', किंवा 'त्यातल्या त्यात या भूमीत जन्म घेतलेला धर्म आंबेडकरांनी निवडला, हे बरे झाले' असे उद्‌गार काढून स्वतःचे समाधान केले जाते हे पण अनुभवाला येते. ही भावना प्रकट करणारे कडवे हिंदुत्ववादी असतात असे नाही. पण एक दरी पडलेली जाणवते. मुद्दा असा की, जेव्हा धर्मांतरे सामूहिक स्वरूपात होतात, आणि ती घडवून आणली जात आहेत असे मत बनते, तेव्हा टोकाच्या प्रतिक्रिया होतात.

तुम्ही कोणत्या धर्माचे वा बाजूचे आहात त्यानुसार तुमची प्रतिक्रिया अर्थातच होते. एकाची जीत ती दुसऱ्याची हार असते.

धर्म ही व्यक्तिगत बाब आहे; कोण कोणता धर्म स्वीकारतो वा टाकून देतो या गोष्टीला प्रतिक्रिया येण्याचे काय कारण, असे म्हणता येते. पण धर्म ही इतकी व्यक्तिगत बाब कधीच नव्हती व आजही नाही. किंबहुना, मानवी व्यवहारातली कोणतीही बाब अशी शंभर टक्के व्यक्तिगत नसते. तिला एक सामूहिक परिमाण असतेच असते. 'धर्म' नावाच्या गोष्टीच्या बाबतीत तर हे अधिकच खरे आहे.

तात्पर्य हे की, धर्मपालन, धर्मांतर, धर्मप्रसार या गोष्टी आधुनिक काळात लोकशाही राज्यांमध्ये व्यक्तीच्या मूलभूत हक्क-स्वातंत्र्याचा भाग असल्या तरी, धर्म ही एक सामूहिक बाब आहे या वस्तुस्थितीचा स्वीकार करूनच विचार करावयास हवा. किंबहुना, हाच न्याय एकेका धर्मांतर्गत पंथ व संप्रदाय यांनाही लागू आहे, प्रॉटेस्टंट-कॅथॉलिक, शैव-वैष्णव, शिया-सुन्नी यांच्यातील संबंधांचे इतिहास डोळ्यांसमोर आणा.

मी कोणता धर्म स्वीकारला वा टाकला, काय फरक पडतो?, कोणी या माझ्या व्यक्तिगत बाबीत नाक खुपसण्याचे काय कारण?, असे म्हणणाऱ्या व्यक्ती आधुनिक, व्यक्तिवादी, सुधारक-प्रागतिक असण्याची शक्यता अधिक. अशा व्यक्तींनाही जीवनात सर्व प्रसंगी ही भूमिका निभावता येत नाही. समाजात कलह माजला, त्याने हिंस्र रूप धारण केले आणि पंथ/संप्रदाय वा धर्म हा जर एक कळीचा मुद्दा असला, तर सामाजिक वास्तवाची बांधणी व व्यवहार वेगळ्याच कसोट्यांवर व मूल्यांनुसार चालतात, ही गोष्ट प्रत्ययाला येते. व्यक्ती आपल्या स्वतःकडे कसे बघते, ती स्वतः कोणती भूमिका घेते, या गोष्टी अप्रस्तुत ठरतात. समाजव्यवहाराचे वास्तव त्याचा 'नियमां'नुसार फैसला करते.

आणि ही गोष्ट केवळ भारतासारख्या धर्मश्रद्ध, 'मागास' मनोधारणेच्या देशांतच खरी आहे असे नाही. मोठ्या प्रमाणावर ख्रिश्चन मंडळी इस्लाम धर्माचा स्वीकार करीत आहेत, किंवा कालपरवापर्यंत आदिम स्वरूपाचे धर्म पाळणारे समूहच्या समूह इस्लामकडे वळत आहेत असे पाहून 'प्रगत', सधन, 'विज्ञाननिष्ठ', आधुनिक ख्रिस्ती समाज व राष्ट्रेही अस्वस्थ झाल्याचे आढळून येत आहे.

एकाच घरात नवरा हिंदू तर बायको मुस्लिम, वा नवरा ख्रिश्चन तर बायको हिंदू, वा एक भाऊ ख्रिश्चन तर दुसरा शीख तर तिसरा बौद्ध (नव-बौद्ध) अशी क्वचित तुरळक अपवादात्मक उदाहरणे आजही आढळतील. पण, एक तर,

अनुक्रमणिका

अशा उदाहरणांच्या बाबतीत, अमूक एका धर्माचे असणे हा केवळ औपचारिकतः धर्म न नाकारलेला असण्याचा भाग असतो; वा बृहत धार्मिक समाजाशी अशी फारकत असते की, व्यक्ती अमुक धर्माची असे म्हणण्याला फारसा अर्थ नसतो. समुदायाच्या बांधणीत धर्म हा इतका अप्रस्तुत घटक ठरण्याचा दिवस उजाडावा अशी इच्छा असली तरी, आपल्याला दिसू शकणाऱ्या भविष्यात व्यक्ती कोणत्या समुदायाची हे ठरविण्याच्या, इतरांपासून वेगळी अस्मिता प्रदान करण्याच्या संदर्भात धर्म ही एक महत्त्वाची बाब म्हणून कायम राहणार आहे.

उदाहरणार्थ, भारतातील ख्रिश्चन व मुसलमान हे बव्हंशी पूर्वीचे हिंदूच होते, ही वस्तुस्थिती कोणी नाकारू शकत नाही. त्याच वेळी ही गोष्टही खरीच की, त्यांनी धर्म बदलल्याने ते एका वेगळ्या समुदायात दाखल झाले, आणि काही एक अंतर निर्माण झाले. दैनंदिन जीवनातल्या पोशाख, खाणे-पिणे, नावे, अभिमानाचे बिंदू, समजुती यांच्यातही काही फरक पडला. तो एकदम टोकाचा नव्हता, आणि तो एकसारखा सर्वत्र आढळत नाही, या दोन्ही गोष्टी खऱ्या. त्यामुळे कट्टर वैमनस्य दर ठिकाणी व वेळी निर्माण झाले नाही असेही आढळते. पण वेगळेपण, दुरावा आणि प्रसंगी ताण व तेढ या गोष्टी आढळतातच.

ख्रिश्चन धर्मस्थळांवर, ख्रिश्चन धर्मीयांवर हल्ले होण्याच्या ज्या घटना अलीकडे घडल्या आहेत त्यांच्यामधून उपस्थित झालेल्या प्रश्नांची चर्चा करीत असताना, म्हणून, धर्म या गोष्टीला असलेले सामूहिक अस्मितेचे परिमाण ध्यानात घेऊनच चर्चा करण्याची गरज आहे.

धर्मांतर, धर्मांतरितांचे 'शुद्धीकरण' वा पुनर्धर्मांतर हे ताण उत्पन्न करणारे, कलह माजविणारे मुद्दे विसाव्या शतकाच्या आरंभापासून तरी नक्कीच राहिलेले आहेत. विशेषतः, प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीच्या दिशेने मोर्ले-मिंटो घटनात्मक सुधारणांच्या रूपाने विभक्त मतदारसंघांची व्यवस्था लागू केली गेली, आणि विभिन्न जातिजमाती व धर्म यांच्या लोकसंख्येला सत्तेच्या राजकारणात महत्त्व प्राप्त झाले तेव्हापासून आपापल्या धर्मीयांची संख्या राखणे व वाढवणे याला वेगळेच महत्त्व प्राप्त झाले.

सामूहिकरित्या इस्लामचा स्वीकार करून धर्मांतर केल्याच्या घटना मोठ्या प्रमाणावर व सार्वत्रिक घडत होत्या असे नाही. जबरदस्तीने लादलेले असो, वा जातिव्यवस्थेतील विषमतेला, शोषणाला वा जाचाला कंटाळून असो, वा प्रलोभनापोटी असो, वा एखाद्या धर्मपुरुषाच्या शिकवणुकीच्या प्रभावामुळे असो, बव्हंश धर्मांतर एकोणिसाव्या शतकाच्या आधीच घडून आले. पण ही प्रक्रिया अगदीच थांबलेली नव्हती. ब्रिटिश राजवटीच्या प्रस्थापनेच्या आधी अशा धर्मांतरांच्या काही तीव्र प्रतिक्रिया होत असल्या तरी, राज्यसत्ता मुसलमानी असल्यामुळे, हिंदू समाजधुरीण, एकप्रकारे, हतबल होते. त्याहीपेक्षा, धर्मांतर करून जातिबहिष्कृत झालेल्या समूहाला परत धर्मात (म्हणजे जातीत) प्रवेश कसा द्यायचा हा पेचच होता. त्यांचे जातभाई व जातपंचायतच यासाठी तयार होत नसावी, आणि तयार नसण्यात आर्थिक-सामाजिक हितसंबंधही गुंतलेले असावेत अशी शक्यता आहे. पेच केवळ धार्मिक नसावा; पण ब्राह्मण्याचे कट्टर पुरस्कर्ते असलेल्या धर्ममार्तंडांचा सनातनी दृष्टिकोनही कारणीभूत होताच. सत्तेच्या संदर्भात संख्या महत्त्वाची नव्हती. ब्रिटिश राजवटीच्या प्रस्थापनेनंतर सगळेच संदर्भ बदलले. धर्म, भाषा, संख्या यांच्या आधारे हिंदू धार्मिक-राजकीय अस्मिता राष्ट्रवादाच्या पायावर जोपासावयास १८६० नंतरच्या काळात सुरुवात झाली. कर्मकांड, रीतिरिवाज, समजुती इत्यादींना लक्ष्य करून ख्रिश्चन मिशनऱ्यांनी हिंदू धर्मावर, हा धर्म नसून खरे तर अधर्मच आहे, या आशयाची कठोर टीकाटिप्पणी चालविली. धर्मप्रसाराचेही कार्य नेटाने चालवले. या आघातालाही वेगवेगळ्या प्रतिक्रिया झाल्या, प्रतिसाद दिले गेले. हिंदू धर्माची फेरमांडणी करून, 'मूळ विशुद्ध व उन्नत रूपा'मध्ये हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन करणाऱ्या आर्यसमाजाची स्थापना, त्याचा प्रसार हा त्यापैकी एक प्रतिसाद. आधुनिक वळणाचे सुधारकी, परिवर्तनवादी असे हे हिंदू धर्माचे आर्यसमाजी रूप जहाल, आक्रमक होते. त्याचे प्रसारक ('स्वामी') हे ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या नमुन्यावर बेतलेले असल्याचे आजही लक्षात येते. ख्रिश्चन मिशनऱ्यांचे धर्मप्रसाराचे कार्य पाहून, व त्याचा आपल्याला असणारा धोका ओळखून मुसलमान समाजातही देवबंदसारखी कट्टर मूलतत्त्ववादी (धर्माचे 'मूळ विशुद्ध, उन्नत रूप' पुनरुज्जीवित करू पाहणारी) धर्मपीठे उत्पन्न झाली असण्याची शक्यता आहे. यामधून धर्मप्रसार व धर्मांतर यांना नव्याने चालना मिळाली.

धर्मांतर, 'शुद्धी', 'संगठन', धर्मांतरांच्या प्रयत्नांवरून व घटनांवरून वादंग माजणे, कलह उत्पन्न होणे या साऱ्या


अनुक्रमणिका

गोष्टींची ही नजीकची पार्श्वभूमी आहे. जुन्या काळातही हा विशुद्ध धार्मिक मामला कदाचित नव्हता. पण आधुनिक भारतात तरी हा धार्मिक इतकाच राजकीय मामला राहिला.

धर्म आणि राजकारण-सत्ताकारण यांचा संबंध जगभर प्राचीन काळापासून चालत आलेला आहे. समाजशास्त्रामध्ये ज्यांना 'सामाजिक संस्था' असे म्हटले जाते त्यांपैकी धर्म ही एक आहे. धर्माद्वारे समुदाय बांधला जातो. तेव्हा, धर्म ही **सामाजिक संस्था** असणे स्वाभाविक व अटळ आहे. धर्मसंस्था आणि राज्यसत्ता परस्परांच्या आधाराने, परस्परांशी संगनमत करून आपापले हितसंबंध साधत राहिल्या आहेत.

विभक्त मतदारसंघांच्या निर्मितीमुळे भारताच्या लोकशाही राजकारणामध्ये जात-जमात-धर्म यांना अधिमान्यता प्राप्त झाली आणि संख्याबळ ही महत्त्वाची बाब बनली. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतीय राज्यघटना सेक्युलर पायावर रचली गेली. पण प्रत्यक्षात राजकारणात जात-जमात-धर्म-भाषा, आणि आता स्त्री-पुरुष भेद, यांचे महत्त्व कमी न होता वाढलेच.

कोणाची जात-जमात-धर्म-भाषा कोणतीही असली तरी सगळे भारतीय नागरिकच आहेत, आणि त्यांचा दर्जा समान आहे, ही गोष्ट खरीच. पण हे भेद राजकारणात अप्रस्तुत तर ठरलेले नाहीतच. त्यांचा आधार न घेता, केवळ राजकीय-आर्थिक विचारप्रणालींच्या आधारेच राजकारण करण्याचा आग्रह जो पक्ष लावून धरील तो अपवादभूत प्रसंगी यशस्वी होताना आढळत असला तरी, सामान्यतः व सार्वत्रिकपणे, निवडणुकांचे राजकारण जात, जमात, धर्म, भाषा यांवर आधारित लागेबांधे, भावना व निष्ठा यांना आवाहन करून केले जाते हे आपण जाणतो. लोकशाही राजकारणात 'मतांचे गठ्ठे' ही गोष्ट महत्त्वपूर्ण असतेच.

या परिस्थितीत, समूहांचे धर्मांतर ही बाब, अटळपणे, तीव्र राजकीय प्रतिक्रिया निर्माण करणारी ठरते. कारण अशा धर्मांतरांना एक राजकारणी अंग असते – प्रच्छन्न वा उघड, तात्कालिक वा दूरदर्शी परिप्रेक्ष्यात.

धर्मांतरे किती होतात, त्यांनी लोकसंख्येच्या प्रमाणात व बलाबलात वास्तविकतः किती फरक पडतो, याची आकडेवारीनिशी थंड डोक्याने चर्चा जरूरच करीत राहिले पाहिजे. विवेकबुद्धी जागी करीत राहण्याची नेहमीच गरज असते. लोकशाहीत तर पुष्कळ अधिकच. कारण, लोकशाही राजकारण व्यवहारात लोकांच्या भावना, विकार, आकांक्षा, पूर्वग्रह, समजुती, भीती यांना आवाहन करीत, चुचकारत, क्षुब्ध करीत चालते. म्हणून, एकीकडे, वस्तुस्थिती समोर आणत राहतानाच, धर्मांतर ही केवळ व्यक्तीच्या मूलभूत स्वातंत्र्याशी संबंधित गोष्ट नाही, तिचे धागेदोरे इतरही जागी पोचतात, याचे भान हरवता कामा नये.

भारतात स्वतःस हिंदू म्हणवून घेणारा समाज हा बहुसंख्यक समाज आहे. हिंदू कोणास म्हणावे याची काटेकोर, आणि सर्वांना मान्य होईल अशी व्याख्या विद्वान प्राच्यविद्यापंडित, मानवसंस्कृती- व समाजशास्त्रज्ञ, विधिज्ञ यांना करता येणे अशक्यप्राय आहे असेही म्हणता येत असले तरी, 'हिंदू' हा शब्द व्यवहारात निरर्थक ठरत नाही. हिंदू राजकीय अस्मितेची एक नवी, आधुनिक पाश्चात्त्य कडव्या राष्ट्रवादी वळणाची बांधणी करण्याच्या प्रयत्नांना येत असलेल्या यशावरून वरील म्हणण्याची सार्थता पटेल. रा.स्व.संघाची स्थापना मुख्यत्वेकरून अशा हिंदू अस्मितेची निर्मिती, जागरण व संघटन करून राजकीय शक्ती उत्पन्न करण्याच्या उद्देशाने झाली. दीर्घकाळ-पावेतो संघाला प्रतिसाद मिळण्याची सर्वाधिक महत्त्वाची कारणे मुस्लिम राजकारणाची धर्मवादी भूमिका, मुस्लिम धर्मवाद्यांची कट्टरता, आणि पुनःपुन्हा होत राहिलेल्या हिंदू-मुसलमान दंगली ही राहिली. तर, संघाचा प्रभाव मर्यादित राहण्याची मुख्य कारणे येथील जातपात व तिच्यामधून झालेली समाजविभागणी, जातिव्यवस्थेबाहेरही अनेक जमातींचे अस्तित्व, आणि संघाच्या धुरिणांची प्रामुख्याने त्रैवर्णिक उच्चवर्णीयांपुरती व शहरी मंडळींपुरतीच असलेली पोच, ही. पण संघ ज्या प्रकारे हिंदू राजकीय अस्मितेची/राष्ट्रवादाची हिंदू अंगाने मांडणी करीत होता तिचे आवाहन त्रैवर्णिक शहरी समाजघटकांपलीकडे प्रभावीपणे पोचणे ही स्वभावतः अशक्य वा असाध्य अशी गोष्ट नव्हती. त्या विचार-व्यूहाचे आवाहन जो जो स्वतःची हिंदू म्हणून ओळख मानतो/देतो, वा जो जो आपल्या जात-जमातीनुसारच्या अधिक पायाभूत-प्राथमिक ओळखीच्या जागी वा भरीला 'हिंदू'ची जोड द्यावयास तयार होईल त्या त्या व्यक्तीला, गटांना, समूहांना पोचू शकत होते. हे सामर्थ्य त्या मांडणीत होते. त्यासाठी गरज दोन गोष्टींची होती. एक, कट्टर, कडव्या, आक्रमक 'शत्रू' समाजाची प्रतिमा उभी करता यायला हवी; ती प्रतिमा वस्तुनिष्ठ आहे हे लोकांना

त्यांच्या परिचयाच्या, अनुभवाच्या चार गोष्टींच्या आधारे पटवून देण्याची गोष्ट जमवायला हवी. दुसरी, संघाच्या रणनीतीमध्ये व कार्यपद्धतीत बदल करावयास हवा. या दोन्ही गोष्टी साधण्यात संघाला गेल्या पंधरावीस वर्षांमध्ये यश आले. संघाचा विस्तारित 'संघपरिवार' अस्तित्वात आला, त्याची भरभराट होत राहिली. याचे प्रत्यंतर ठळकपणे बाबरी मशीद-रामजन्मभूमी प्रकरणी आले. हिंदुत्वाच्या संघप्रणीत भूमिकेपेक्षाही अधिक हिंस्र स्वरूपात हिंदुराष्ट्रवादी भूमिका शिवसेनेने घ्यावी, आणि १९९२ च्या दंगलींच्या रूपाने तिला समाजात व्यापक पाठिंबा मिळावा या दोन्ही गोष्टी नीट समजून घ्यायला हव्यात.

आता हिंसेवर विश्वास असणाऱ्या कडव्या हिंदुत्ववादी संघटनांनी ख्रिश्चनांकडे आपला मोहरा वळविला आहे. ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या धर्मप्रसारकार्याबद्दल दीर्घकाळ हिंदू समाजाच्या मनात ठाम ग्रह व प्रतिक्रिया मुरलेल्या आहेत. थेट एकोणिसाव्या शतकापासून. मिशनऱ्यांचे काम ज्या दुर्गम भागांमध्ये, ज्या आदिवासी जमाती वा पूर्वास्पृश्य जाती यांच्यामध्ये चालते त्यांच्यात जाऊन सेवाकार्य करण्याची स्वतःची तयारी नाही याचे भान या मंडळींना होते. सहानुभाव व क्रियाशील करुणा या जातिजमातींबद्दल हिंदू समाजातल्या त्रैवार्णिकांना नव्हती हे तर झालेच; पण शूद्र गणल्या जाणाऱ्या जातींनाही नव्हती, हे ध्यानात घेतले पाहिजे. मनात ग्रह-पूर्वग्रह तसेच राहिले, नाराजी व रागही दडलेला राहिला. पण कृतिशून्यताही राहिली. ही प्रतिक्रिया केवळ ब्राह्मण वा तत्सम उच्चवर्णीयांच्या ठायी आहे हा गोड भ्रम बरीच वर्षे डावी, पुरोगामी, सेक्युलर मंडळी बाळगत आली आहेत. आजही त्याचाच ते पुनरुच्चार करीत असतात. बाबरी मशीद पाडल्यानंतरच्या काळात मुंबईत दंगली माजवल्या गेल्या ही गोष्ट श्रीकृष्ण आयोगाच्या अहवालातून समोर आलेलीच आहे (जी वस्तुस्थिती तशी आधीही माहीतच होती). या दंगलींमध्येही शूद्रातिशूद्र वा स्त्रियाही दंगलखोरांनाच त्यांचे तारणकर्ते मानीत होत्या, आणि दंगल माजवणाऱ्यांना विरोध असलेली आपण मंडळी काठावर फेकलो गेलो होतो, हे वास्तव अजूनही स्वीकारले जात नाही. ख्रिश्चनांवरील हल्ल्यांचा, त्यांच्या धर्मस्थळांचा वा त्यांच्या संस्थांच्या मालमत्तेचा विध्वंस करणाऱ्या हल्ल्यांच्या संदर्भातही, याच प्रकारची, वास्तवावर पांघरूण घालून, तीच रेकॉर्ड लावली जाण्याची आपली चूक होत आहे. या हल्ल्यांमागील हिंदुत्ववादी राजकारण, या कृत्यांना चालना देणाऱ्या संघटना व व्यक्तींचा हिंदुत्वविचार स्पष्ट आहे. ती मंडळी आज ते लपवीत नाहीतच (कायद्यात गुन्हेगार म्हणून सापडू नये यादृष्टीने कबुली देत नाहीत, हे वेगळे). त्यांना असलेल्या व्यापक पाठिंब्याची दखल न घेण्याची चूक होत आहे.

संघ व संघपरिवार, भाजप व शिवसेना यांचा हिंदुराष्ट्रवाद हा भारताच्या ऐकात्म्याला पोषक नाही तर मारक आहे; देश अनेकानेक चिरफळ्यांनी भंगलेला व दुबळा ठेवण्यातच त्याची परिणती होत आहे, आणि सर्वंकष ठोकशाही प्रस्थापित केली तरी या भूमिकेमधून भारताची समर्थ व समृद्ध राष्ट्र म्हणून उभारणी होणार नाही याविषयी आम्ही निःशंक आहोत. तसेच दंगली माजवणे, धर्मस्थळे वा संस्था उद्ध्वस्त करणे, वस्त्यांवर, लोकांवर हल्ले चढविणे या कृत्यांचे विश्लेषण करणे म्हणजे त्यांचे समर्थन करणे नव्हे, आणि आम्ही या कृत्यांचे खंडनच करतो. ओरिसा राज्यात स्टेन्स या मिशनऱ्यांची, त्यांच्या कोवळ्या वयातील मुलांसह, झोपेत जाळून त्यांना जिवे मारण्याची कृती तर उन्मत्त व अमानुष क्रौर्याचे प्रदर्शन करणारी भ्याड कृतीच होती.

येथे एक महत्त्वाचा 'पण' आहे. अशी कृत्ये हिंदुत्ववाद्यांनी वा हिंदू समुदायांनी केली म्हणजे ती निषेधार्ह निंद्य; पण इतर समाजघटकांनी केली तर, अंतिमतः खापर हिंदूंवर वा हिंदुत्व-वाद्यांवर फोडण्याच्या दृष्टीने त्यांचे विश्लेषण-स्पष्टीकरण करावयाचे या प्रकारचा पक्षपात न करण्याचे पथ्य काटेकोरपणे सांभाळले गेले पाहिजे. 'जी भूमिका वा विचारव्यूह वा कृती मला योग्य, इष्ट व आवश्यक वाटते ती करण्यासाठी मी कोणतीही वा कितीही अमानुष वा विध्वंसक कृत्ये केली तरी ती योग्यच, व समर्थनीय; आणि त्यांची जबाबदारी पुन्हा विरोधक प्रतिपक्षीय शत्रूवरच टाकणे योग्य' ही भूमिका जो जो घेतो तो ठोकशाहीची, अमानुषतेची, कट्टर आक्रमक मूलतत्त्व-वादाचीच पुष्टी करीत असतो.

हिंदुत्ववाद्यांचा आज जोर आहे, तेव्हा नमते घ्या, गप्प बसा असे हे सांगणे नाही. पण कट्टर आक्रमकतेचा काटा प्रतिवादी कट्टर आक्रमक भूमिका घेऊन काढण्याची गोष्ट, कट्टरता द्विगुणित वा अनेकगुणित करते, हे सांगण्याची गोष्ट आहे. जिथे कट्टरता वाढते आणि हिंसा-अहिंसेचा विवेक टाकून दिला जातो तिथे माणुसकीचा व मूलभूत लोकशाही स्वातंत्र्यांचा लोप होतो.

अनुक्रमणिका






आम्हाला तर असे दिसते की, गेल्या पंधरावीस वर्षांमध्ये, समाजकारण-राजकारणाच्या क्षेत्रात वैरभाव जोपासणारे कट्टर, आक्रमक व हिंस्र वातावरण भारतात वाढत चालले आहे; इतकेच नाही तर, जोपासले जात आहे. दुसऱ्याची ठोकशाही अंगलट येते तेव्हा लोकशाही मूल्ये व रीती यांचा पक्ष घ्यावयाचा, स्वातंत्र्यांवद्दल बोलावयाचे; पण एरवी आपणही ठोकशाहीची मनोमन पुष्टी करणारे, जमेल तेथे तिचा अवलंब करण्यास प्रवृत्त करणारे कट्टर व आक्रमक पवित्रे घ्यावयाचे, ही चाल अवलंबिली जात आहे.

हिंदुत्ववाद्यांच्या धर्तीचे कट्टर धर्मवादी राजकारण मुस्लिम लीगच्या नेत्यांनी १९३७ नंतरच्या काळात केले. या त्यांच्या राजकारणास मुस्लिम समाजात व्यापक पाठिंबा मिळाला. त्याची फलश्रुती पाकिस्तानच्या निर्मितीत झाली. स्वातंत्र्य मिळाल्यावर विभक्त मतदारसंघ गेले; पण मुस्लिम लीगी वळणाचे अलगतावादी, धर्मवादी, व अल्पसंख्यवादी राजकारण केले जात राहिले. उत्तरोत्तर त्याची कट्टरताही वाढत गेली. हमीद दलवाई, नरहर कुरुंदकर यांचे निरीक्षण व विश्लेषण दुर्लक्ष करण्यासारखे नाही. शाहबानो प्रकरणात, काश्मीरमध्ये याचा अनुभव येत राहिला. शीखांनीही धर्म व राजकारण यांची सांगड घालून दीर्घ काळ राजकारण केले. खलिस्तान हा त्या राजकारणाचाच विस्तार होता. आंबेडकरवादी चळवळीने कट्टरता एक धोरण म्हणून जोपासलेली आहे. कट्टर राजकारण करणारे पक्ष, चळवळी प्रसंगी भ्रष्ट वा स्वार्थी हितसंबंधी तडजोडी करतात. पण कट्टरपणा टाकून देतात असे नाही. स्वातंत्र्यापूर्वी गोरे-काळे असा वर्णभेद, व त्यामधून येणारी उच्चनीचता या गोष्टींपलीकडे, 'एकाच धर्माचे असणे' हा राज्यकर्त्यांशी एतद्देशीय ख्रिश्चनांना जोडणारा अनुबंध होता. दीर्घ काळ ख्रिश्चन समाज ब्रिटिश राज्यसत्तेच्या आश्रयाने लाभ भोगीत राहिला. ख्रिश्चन धर्मपीठांचे व सत्ताधाऱ्यांचे सख्य, हातमिळवणी असे. याचा अनुभव स्वातंत्र्यलढ्याशी समरस होऊ पाहणाऱ्या वेरियर एल्विन, दीनबंधू अँड्र्यूज यासारख्यांना व इतरही अनेकांना आला. स्वातंत्र्यानंतर ख्रिश्चन समाजाने अ-राजकीय भूमिका तरी घेतली किंवा काँग्रेसशी सख्य ठेवले. मध्यंतरी एक काळ असा आला की, धर्मप्रसारावरचा जोर नगण्य झाला आणि चर्चमध्येही 'सर्वधर्मसमभावा'ची (एक्युमेनिकल) भूमिका अंगिकारिली गेली. पण अगदी अलीकडे मात्र, धर्मांतरापूर्वीच्या अनेक प्रथा पाळत राहण्याविरुद्ध भूमिका घेऊन, 'विशुद्ध धर्म' रुजविण्याचा परिणाम व आविष्कार म्हणून एक ख्रिश्चन अस्मिता जोपासत ख्रिश्चन राजकीय संघटन बांधले जात आहे. राजकारणाची लोकशाही प्रक्रिया एकंदरीने अधिक कट्टर होत चालल्याचाच हा एक भाग व परिणाम म्हणता येईल. या घडामोडींचा एक हिंदुत्वविरोधी रोख पण आढळून येतो. याला एक पार्श्वभूमी आहे. आदिवासी क्षेत्रांमध्ये वा पूर्वास्पृश्यांमध्ये वा कनिष्ठ जातीयांमध्ये वा नागालँड, मणिपूर, मिझोराम या भागांमध्ये संघपरिवाराने सेवाकार्य करणाऱ्या व्यक्ती व संस्था यांचे जाळे बांधले आहे. त्याला एक धार्मिक-राजकीय परिमाण आहे. हे अंग त्यांनी लपविले आहे असे नाही. म्हणजे, ज्या प्रदेशांमध्ये वा लोकांमध्ये कट्टरतेचा अभाव होता व त्यापोटी उद्भवणारे कलह वा संघर्ष नव्हते ते आता दोन्ही बाजूंच्या वाढत्या कट्टरपणाने उत्पन्न होत आहेत.

कडव्या हिंदूंनी राज्यघटनेने दिलेले स्वातंत्र्य/हक्क वापरून धर्मप्रसाराचे कार्य करून हिंदू अस्मिता जागविण्याचे, ती पुष्ट करण्याचे व कट्टर करण्याचे काम चालविले, व ते कार्य करीत असता शांततापूर्ण सनदशीर मार्ग सोडला नाही, तर मग आक्षेप कोणता घेता येईल? आदिवासी वास्तविक पाहता हिंदूधर्मीय नाहीत, असे म्हणण्याने प्रश्न निकालात निघत नाही. ते मुळात ख्रिस्तीही नव्हते. ते मुळात जहाल क्रांतिवादी, परिवर्तनवादी वा नक्षलवादीही नव्हते. पण कोणा कोणाच्या कार्यामुळे असे त्यांचे परिवर्तन घडून येणे जर आक्षेपार्ह नाही तर मग एका हिंदू धर्माचा व अस्मितेचा प्रसार करणाऱ्यांवरच आक्षेप का? या प्रश्नालाही समर्पक उत्तर देणे आवश्यक आहे.

धर्मपालन, धर्मप्रसार, धर्मांतर यांचे व्यक्तीला स्वातंत्र्य राज्यघटनेने दिलेले आहे, वा द्यायला हवे, अशी औपचारिक सैद्धांतिक भूमिका पुरेशी ठरत नाही. हे स्वातंत्र्य खऱ्या अर्थाने पदरात पडण्यासाठी सर्वांनीच काही पथ्ये सांभाळणे, मूल्यांचा आदर करणे आवश्यक ठरते.

धर्म ही केवळ व्यक्तिगत बाब आहे असे म्हणण्यासारखे धर्माचे स्वरूप नाही; धर्म ही एक सामाजिक संस्था पण आहे, ही गोष्ट ध्यानात घ्यावी लागते. आज पाश्चिमात्य जगात कोणी व्यक्ती 'बौद्ध' बनते वा रामकृष्ण मिशनच्या व्याख्येतली 'वेदान्ती' बनते, वा 'हरेकृष्ण' चळवळीत दाखल होते तेव्हा हे परिवर्तन रूढार्थाने 'धर्मांतर' नसते. एका प्रस्थापित

धर्मसंस्थेच्या व्यूहामधून दुसऱ्या, प्रतिस्पर्धी व्यूहामध्ये प्रविष्ट होण्याची ती गोष्ट नसते. त्याच वेळी 'हरेकृष्ण चळवळ' हा एक संप्रदाय बनला आहे; आणि, त्या संप्रदायाच्या नावाने राजकारण केल्याचा इतिहास यापूर्वी नसला तरी, उद्या त्याला रूढ धर्मसंस्थेसारखेच राजकीय परिमाण प्राप्त होऊ शकते. तसे झाले तर सर्व गुंतागुंत या चळवळीच्या संदर्भातही उत्पन्न होईलच.

कळीचा मुद्दा आक्रमक कट्टरतेचा, त्या कट्टरतेमधून उत्पन्न होणाऱ्या अन्य धर्मीयांविषयीच्या प्रतिस्पर्धी वैरभावाचा, किमानपक्षी, चुरशीचा आहे. कोणत्याही प्रकारचा कट्टरपणा निर्माण न करता, वा होऊ न देता, अनाक्रमकतेने केलेल्या धर्मपालन, धर्मप्रसार व धर्मांतर या गोष्टींसाठी रेव्हरंड नारायण वामन टिळक यांचे उदाहरण आदर्श म्हणून डोळ्यांसमोर ठेवण्यासारखे आहे.

दुसरा मुद्दा सामूहिक धर्मांतराचा आहे. धर्मांतर जेव्हा एकाच वेळी मोठ्या समुदायाचे, वाजतगाजत, समारंभपूर्वक घडवून आणले जाते तेव्हा त्यात हार-जीतची भावना निर्माण होते, वा केली जाते. असे धर्मांतर हे धाकामुळे, व्यक्तिगत प्रभावापोटी, वा कोणत्या ना कोणत्या प्रलोभनाखातर झाले आहे अशी शक्यता वाढते. व्यक्तीने, एकीकडे, नव्या धर्माची शिकवण, धर्मसंस्था, (धार्मिक विधी, प्रथा, रूढी, कर्मकांड, रीतिभाती, या अर्थाने) धर्माचा लौकिक व्यवहार सारे नीट पारखून घेऊन, आणि, दुसरीकडे, अंतर्मुख होऊन आत्मपरीक्षण करून, स्वतःसाठी हा नवा मार्ग निवडला, असे धर्मांतराचे वास्तविक स्वरूप असावयास हवे. आधीच व्यक्तिवादी वळण मुरलेल्या आधुनिक पाश्चात्त्य समाजात धर्मांतर असे घडेल. आपल्यासारख्या समाजात, सामान्यतः, धर्मांतराची प्रक्रिया ही जातिधिष्ठित संरचनेला अनुसरून होणे स्वाभाविक व काहीसे अटळही आहे. गोतावळा वा जाति-समूह हे कर्त्या, वडीलधाऱ्यांच्या सामूहिक निर्णयानुसार एकदम धर्मांतर करतात, अशी प्रक्रिया घडून येण्याची शक्यता अधिक. एकट्या-दुकट्याने धर्मांतर केले तर ती व्यक्ती वा कुटुंब जाति/जमात बहिष्कृत ठरून तिचा/त्यांचा छळही होऊ शकतो.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या आदेशाला अनुसरून, कमालीच्या भक्तिभावाने लाखोंनी बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. राजकारणाच्या क्षेत्रात त्यावेळच्या सर्वाधिक बलिष्ठ व वरचढ अशा काँग्रेसचे आंबेडकर कट्टर विरोधक होते व हिंदू धर्मावरील त्यांची टीकाही टोकाची होती. १९३४ सालच्या आसपास त्यांच्या धर्मांतराच्या घोषणेविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया उमटली होती. पण १९५६ साली धर्मांतराचा समाजाने स्वीकार केला. याचे रहस्य काय? हिंदू धर्म व समाज यांच्या विरोधात पवित्रा घेतलेल्या प्रतिस्पर्धी धर्मात आंबेडकरांचे अनुयायी प्रवेश करणार नव्हते. प्राचीनकालीन बौद्ध धर्म हा असा प्रतिस्पर्धी धर्म म्हणून भरभराटला होता; त्याला राजाश्रयही, धनिकाश्रयही मिळाला होता. पण तो बौद्ध धर्म व समाज लुप्तप्राय झाला होता. बौद्ध धर्माची निवड बाबासाहेबांनी केली याचे स्वागतच झाले. हिंदू धर्मातला एक पंथ म्हणावा इतकी जवळीक भगवान बुद्ध व त्यांची शिकवण यावद्दल हिंदूंच्या ठायी एव्हांना रुजली होती. घरातल्या घरातच, समजुतीने, प्रेमाने वेगळी चूल मांडल्यासारखे हे धर्मांतर लोकांना वाटले. आणि बाबासाहेबांनीही आपण धर्मांतरासाठी धर्माची निवड करताना या प्रकारचा तरतम विवेक केल्याचे सूचित केले.

एकेकाळी हिंदू धर्मातून समूहांनी इस्लामचा स्वीकार केला. पुढे ब्रिटिश अमदानीत ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला. तेव्हा राज्यसत्तेचे पाठबळ धर्मांतरांच्या मागे आहे हे दिसत असल्याने एक हतबलता होती. आज लोकशाही व्यवस्थेत अशी हतबलता उरलेली नाही. राजकारण-समाजकारण यामध्ये प्रतिस्पर्धी भूमिका घेणाऱ्या धर्माची निवड आपल्यापैकी समूहच्या समूह घेत आहेत ही गोष्ट कोणताच धार्मिक-सामाजिकदृष्ट्या संघटित धर्मीय समाज सहजी खपवून घेणार नाही. उदाहरणार्थ, नवबौद्धांपैकी समूहच्या समूह पुन्हा हिंदू, वा नव्याने ख्रिश्चन वा मुसलमान जर होऊ लागले तर आंबेडकरी चळवळीची प्रतिक्रिया तीव्र होईल, व अशा समूहांवर हल्लेही होतील, ही शक्यता कमी नाही.

म्हणजे, राजकारण-समाजकारण-अर्थकारण या क्षेत्रांमध्ये धर्मीय समाज धर्माच्या पायावर परस्परांचे विरोधक वा स्पर्धक नाहीत अशी स्थिती असण्याची नितांत गरज आहे. दुसरी गोष्ट, विभिन्न धर्मांचे, धर्मसंस्था, धर्मगुरू यांचे परस्परांमधील संबंध शत्रुत्वाचे नसण्याची, मित्रत्वाचे असण्याची गरज आहे. धाकदपटशा, प्रलोभने, फसवणूक, अज्ञानाचा फायदा अशा मार्गांनी धर्मांतर घडवून आणले जात नाही, आणि तसे घडत असेल तर अशा धर्मांतराचे स्वागत/स्वीकार होणार नाही, अशी सर्वच धर्मांतील मान्यवर प्रमुखांची भूमिका हवी. तिसरी






गोष्ट, धर्मांतर ही, समाज नावाचे घर न मोडता, म्हणजे समाजाच्या ऐकात्म्याला बाधा न आणता, सर्वांच्या समजुतीने होणारी गोष्ट आहे, असे घडायला हवे.

या तीन अटी ध्यानात घेतल्यावर, दोन प्रतिक्रिया होण्याची शक्यता आहे. धर्माधर्मांमधील संबंध जर वरीलसारखे बंधुभावाचे, समभावाचे, खेळीमेळीचे असतील तर धर्मांतर तरी करण्या-करविण्याची जरूरी उरतेच कोठे? विंचवाची नांगी मोडून टाकल्यावर उरलेल्या प्राण्याला विंचू म्हणणे शोभत नाही तशीच ही गोष्ट होईल; धर्मांतरात, जो धर्म समूह टाकून देत असतो त्या धर्माला डंख मारून 'जखमी' करणे हे धर्मांतरामागील एक उघड वा प्रच्छन्न प्रयोजन असते ना. या दोन्ही संभाव्य प्रतिक्रिया अर्थपूर्ण आहेत.

म्हणजे आपण परत पहिल्या मुद्याशी येतो. शत्रुत्वाच्या भूमिकेमधून कट्टर आक्रमकतेचेच जर प्रतिस्पर्धी संबंध व वातावरण भिन्नधर्मीय समाजांमध्ये असले, वा जोपासले जात असले, तर धर्मांतर ही तेढ व कलह उत्पन्न करणारीच गोष्ट बनणार, हे अटळ आहे. तोच परिणाम, खरे तर, हवा आहे असा अर्थ होतो.

मग, केवळ धर्मांतर नव्हे तर, धर्मपालनही समाजाच्या ऐकात्म्याच्या आड येणारी गोष्ट ठरते. याचा प्रत्ययही आपण मुंबईत महाआरती व नमाज यांच्या स्वरूपात घेतला आहे, घेत आहोत. पूर्वी सार्वजनिकरित्या कधी साजरे होत नव्हते ते धार्मिक सण, उत्सव वा विधी प्रदर्शन करीत, दिमाखाने व आक्रमक वृत्तीने साजरे करण्याची नीती हिंदुत्ववादी पक्ष राबवीत आहे हे लक्षात येते. धर्मस्थळांचे जीर्णोद्धारही केले जात आहेत. यापासून मार्गदर्शन घेऊन अन्यधर्मीय समाजही या प्रकारे धर्मपालन करू लागले आहेत.

या साऱ्यापासून बोध घ्यावयास हवा. हिंदुत्ववाद्यांनी तर घ्यायला हवाच. पण इतर धर्मीयांनीही, स्वतःचे 'अल्पसंख्यक'-पण पुढे करून, जणूकाही या बाबतीतली सर्व जबाबदारी हिंदूंची आहे ही भूमिका घेणे, व सर्व अनिष्ट गोष्टींचे, परिणामांचे खापर हिंदूंवर फोडणे गैर ठरेल. त्यांनीही बोध घ्यायची तेवढीच गरज आहे.

धर्मपालन, धर्मप्रसार व धर्मांतर यांचे स्वातंत्र्य समानत्वाने सर्वांना उपभोगावयास मिळावयाचे असेल तर कट्टर आक्रमकतेचा त्याग करण्याचे, परधर्मीयांना शत्रू लेखून त्यांच्यावर मात करण्यासाठी छेड न काढण्याचे पथ्य कटाक्षाने सांभाळले पाहिजे. अन्य व्यक्ती, समूह यांच्याविषयी सहृदय सहोदरत्वाची भावना, मतभेद असले तरी आदरभाव, इतरांच्या स्वातंत्र्याचे रक्षण-संवर्धन करण्याच्या जबाबदारीचे पालन, कठोर चिकित्सा वा प्रसंगी निकराचा विरोध करीत असतानाही माणुसकी जपण्याचे कर्तव्यपालन, हिंस्र भाषा व कृती यांचा त्याग या गोष्टी लोकशाही जीवनमूल्यांच्या, रीतींच्या व संस्कृतीच्या गाभ्याशी आहेत. या अर्थाने लोकशाहीचे पालन करण्यास बांधील असणाऱ्यांनाच स्वातंत्र्यांवर/हक्कांवर अधिकार सांगता येतो.

डाव्या, पुरोगामी, सेक्युलर चळवळी, संघटना, पक्ष हिंदूधर्म, हिंदूपण आणि हिंदू समाज यांचा कट्टर आक्रमक वृत्तीने अधिक्षेप करीत, त्यांच्यावर आरोप करीत, या समाजाविरुद्ध एक सबगोलंकार आघाडी उभारून हिंदूंना एकटे पाडून कोंडीत पकडण्याची, अल्पसंख्यक ठरविण्याची रणनीती राबवीत आहेत. या रणनीतीचा भाग म्हणून ते अन्यधर्मीय समाजाच्या कट्टर आक्रमक भूमिका वा कृती यांच्यावर पांघरूण तरी घालतात, वा त्यांच्यासाठीही हिंदूच कसे जबाबदार आहेत असे दाखवून देऊ पाहतात. या रणनीतीच्या अवलंबनाने राजकीय सत्ता 'आम्ही हिंदू नाही' असे म्हणणाऱ्या आघाडीच्या हाती उद्या आलीच तरी, त्या आघाडीच्या राज्यात लोकशाही जीवनमूल्ये व संस्कृती बहरेल, समाजवादी समाजाची निर्मिती जवळ येईल, जातपात, स्पृश्यास्पृश्यता, धर्मभेद मिटलेला एक पुरोगामी समाज प्रस्थापित करणे सोपे जाईल, याची खात्री नाही. किंबहुना, ही फळे त्या वृक्षाला लागणार नाहीत. या आघाडीत सहभागी असणाऱ्यांच्यामधील एकमेव दुवा, आज तरी, हिंदूविरोध असल्याचे दिसते. आघाडीतला जो तो घटक असा कट्टर व आक्रमक आहे की, आघाडीतल्या घटकांचेही एरवी परस्पर सख्य नसल्याचे सतत अनुभवाला येते. कट्टर आक्रमकतेचे परिणाम आणखी वेगळे कोणते होणार? भारतीय समाजाला डावा, पुरोगामी, सेक्युलर आकार देण्याचा मार्ग हिंदूधर्म, परंपरा व समाज यांच्याशी उभे वैर हा नाही, त्यांच्याविरोधी आघाडी बांधणे हा नाही. हा आत्मघातकी मार्ग आहे.

संघपरिवार व भाजप यांचा हिंदुत्ववाद कांकणभर अधिकच देशबुडवा आहे. याचे कारण, बहुसंख्यक असलेली या देशाची मुख्य धारा 'हिंदू' या नावाने ओळखली जात असल्याने, हिंदू समाजाची, या समाजाच्या धुरिणांची जबाबदारी वडीलधाऱ्यांची आहे. ती जास्त मोठी आहे. 'जशास तसे', 'शठं प्रति शाठ्यं'

वाढलेल्या धर्मवादी कट्टर भूमिकांमुळे वातावरणात तेढ उत्पन्न होऊन आदिवासी जमातीतच तट पडून कलह माजत आहे. वर्तमान-पत्रांतील बातम्या व वार्तापत्रे यांवरून असे चित्र समोर येते. 'टाळी एका हाताने वाजत नाही' ही म्हण येथे खरी ठरत असल्याचा बोध ठसतो.

भारतात धर्मपालन, धर्मप्रसार व धर्मांतर यांचे स्वातंत्र्य अबाधित राहून भिन्नधर्मियांमध्ये बंधुभाव, एकोपा व शांती राखावयाची असेल तर सर्वधर्मसमभावाची वृत्ती सर्वांच्या ठायी असणे ही प्राथमिक पायाभूत शर्त आहे. 'शुद्धीकरणा'च्या नावाखाली धर्मश्रद्धेला व धार्मिक जीवनाला कट्टर वळण द्यायचे नाही, या पथ्याचे पालनही कटाक्षाने व्हावयास हवे. तिसरी शर्त, चढाओढीने परस्परांवर मात करण्याचे लक्ष्य कोणाच्याच डोळ्यासमोर नसायला हवे. ही जर भूमिका असेल तर, निःपक्ष-पातीपणे, हल्ले, विध्वंस यांच्या मुळाशी उभयपक्षी काय चुकले आहे याची समंजसपणे बोलणी होणे अवघड नाही.

पण अनुभव असा येतो की, एक पक्ष गुन्हेगार आहे व पूर्ण अपराध त्या पक्षाचा आहे, हा निवाडा आधीच करून मग घटनाक्रम मांडला व रंगविला जातो. 'फॅसिस्ट' हिंदुत्ववादी शक्ती ख्रिश्चनांचा निःपात करावयास निघाल्या आहेत असे एक बाजू म्हणते, तर पैसा पेरून, प्रलोभने दाखवून धर्मांतरे करून या देशात ख्रिश्चनधर्मीय लोकसंख्येची वाढ घडवून आणावयाचा 'प्रोजेक्ट' विदेशी शक्तींनी हाती घेतला आहे; धर्माच्या बुरख्याखाली राष्ट्रद्रोह जोपासणे चालू आहे, असे दुसरी बाजू म्हणते. काय घडले हे तपासून पहावयास जाणाऱ्या व्यक्ती वा संघटनाही, चष्मे चढवूनच जातात.

यामुळे आज तरी एक अशी कोंडी निर्माण झाली आहे की सत्य, सामंजस्य, एकोपा यांचा बळी जात आहे.

ओरिसा राज्यात मिशनरी म्हणून गेली वीस-बावीस वर्षे कुष्ठ-रोग्यांच्या सेवेचे काम करीत असलेल्या फादर ग्रॅहम स्टेन्स यांची, त्यांच्या दोन कोवळ्या वयाच्या मुलांसह, ते स्वतःच्या गाडीत झोपले असताना, रात्रीच्या अंधारात, जाळून हत्या केली गेली. ही हत्या झाली, ती बुद्धिपुरस्सर केली गेली, या दोन्ही गोष्टींबद्दल दुमत नाही. हे कृत्य नीच व अधम आहे, ही भ्याडाची हिंसा आहे आणि म्हणून ती पूर्णतया निषेधार्ह आहे, याबद्दलही दुमत असायला नको. पण याची मात्र खात्री देता येत नाही, ही विषाद उत्पन्न करणारी वस्तुस्थिती आहे.

हे कृत्य कोणी केले हे निर्विवादपणे सिद्ध झालेले नाही. बजरंग दलाच्या मंडळींनी हे कृत्य केले असा आरोप केला गेलेला आहे. या प्रकरणी भाजपचे एक नेते व केंद्रीय मंत्री मदनलाल खुराणा यांनी, हे आरोप खरे असल्याचे मत व्यक्त करीत, राजिनामा दिला. तेव्हा संशयाला जागा राहते इतके तर खरेच..

कृत्याची जबाबदारी कोणाची, या प्रश्नाला, आजच्या परिस्थितीत, एक राजकीय परिमाण असल्याने वरील आरोप परतवून लावण्यात (वा तो आरोप करीत राहण्यात) बरीच शक्ती खर्ची पडत राहिली. या घटनेमधून जे मुद्दे उपस्थित झाले होते त्यांच्याकडे दुर्लक्षच आहे.

हत्या घडून गेल्यानंतर काही दिवसांनी ग्रॅहम स्टेन्सच्या पत्नी ग्लॅडिस स्टेन्स व त्यांची १३ वर्षांची मुलगी एस्थर यांचे निवेदन वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले. त्यांच्या प्रतिसादाने हे सर्व प्रकरण एका वेगळ्याच पातळीवर उचलले गेल्याची अनुभूती आली. ग्लॅडिसबाईंच्या मनाचा मोठेपणा, त्यांच्या सहानुभावाचे व करुणेचे सर्वव्यापित्व, त्या प्रतिसादाची आध्यात्मिक खोली व उंची यांनी आपण त्यांच्यापुढे नतमस्तक झालो असेही लक्षात आले. 'तेथे कर माझे जुळती' ही ओळ सार्थ झाली.

आर्यसमाजी स्वामी अग्निवेश यांचा एक लेख 'टाइम्स ऑफ इंडिया' या दैनिकाच्या ४ फेब्रुवारी १९९९ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. ग्लॅडिस स्टेन्स यांच्या प्रतिसादाला त्यांनी दाद दिलेली पाहून समाधान वाटले. वैदिक धर्माचे श्रेष्ठत्व आग्रहपूर्वक प्रतिपादणाऱ्या, त्याचवेळी प्रचलित हिंदूधर्माची आमूल सुधारणा करण्याची आक्रमक भूमिका घेणाऱ्या आर्यसमाजाच्या रीतीनुसार संन्यास घेतलेल्या स्वामी अग्निवेश यांनी हा लेख लिहावा याला विशेषच महत्त्व आहे.

सर्व माणसे ही ईश्वराची लेकरे असली, तर खुनी, मारेकरी ही पण ईश्वराची लेकरेच. आणि, जे काही घडते ते ईश्वरी इच्छेनेच घडते ही जर श्रद्धा व निष्ठा असेल, तर या प्रकारे मृत्यू यावा ही पण ईश्वरेच्छाच असणार. ईश्वराचा हेतू कळणार नाही; पण तो भलाच असणार, कारण ईश्वराचा हेतू वाईट कसा असू शकेल? म्हणजे, कृत्य सैतानी खरे, पण.... खुनी, मारेकऱ्यांविषयीही मग हृदयात क्षमाच असणार. त्यांच्याविषयीही मनात बंधुभाव व करुणाच असणार.

ग्लॅडिसबाई मनात अंतःकरणपूर्वक काय काय म्हणाल्या






– सगळे काही आपल्याला माहीत नाही. ख्रिस्त सुळावर मानवजातीसाठी बळी जात होता तेव्हा, 'देवा, त्यांना क्षमा कर; आपण काय करीत आहोत ते त्यांना कळत नाही' असे उद्‌गार, त्याला मृत्यूदंड ठोठावणाऱ्यांविषयी त्याने काढल्याचे सांगितले जाते. ग्लॅडिसबाईंनी मनोमन हीच प्रार्थना देवापाशी केली असेल.

ओरिसातील त्या संथाळी लोकांमध्ये आपल्या दिवंगत पतीचे कार्य पुढे चालू ठेवण्याचा 'निर्धार' त्यांना करावा लागला नसणार. तो निर्णय सहजीच झाला असेल. कारण ते त्यांना स्वतःचे नैतिक कर्तव्य असल्याचे दिसत असणार.

आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दयानंद सरस्वतींची हकीकत स्वामी अग्निवेश यांनी दिली आहे. उच्चवर्णीय सनातनी हिंदू विरोधकांच्या सांगण्यावरून त्यांच्यावर अन्नामधून विषप्रयोग करण्यात आला. यामधून आपण वाचत नाही असे लक्षात आले तेव्हा, ज्या स्वयंपाक्याने यात हस्तकगिरी केली होती त्या स्वयंपाक्याला स्वामीजींनी बोलावून त्याच्याकडून सारी हकीकत जाणून घेतली. त्या स्वयंपाक्यास त्यांनी क्षमा तर केलीच, पण नेपाळात पळून जाऊन जीव बचावण्यास पैशांची मदत पण केली.

स्वामी अग्निवेश लिहितात, "The uncompromising commitment to love and service, even at the cost of one's own life, is the true essence of spirituality." पुढे ते म्हणतात, "The ascendancy of hate and the corresponding atrophy of compasssion betray the weakness rather than strength of a religion." स्वामी अग्निवेशांच्या या शब्दांपासून योग्य तो बोध सर्वच धर्मांच्या अनुयायांनी व प्रचारकांनी घ्यायला हवा.

पण एक पाऊल पुढेही जाण्याची गरज आहे. ग्लॅडिस स्टेन्स व त्यांची मुलगी एस्थर यांचा वस्तुपाठ केवळ सर्व धर्मांमधील मूलतत्त्ववादी धर्मवाद्यांसाठीच आहे असे नाही. तो तेवढाच इहवादी, डाव्या, पुरोगामी, क्रांतिकारक, विद्रोही परिवर्तनवाद्यांसाठीही आहे. तो इहवादी, आधुनिकवादी, विज्ञानवादी सावरकरवादी मंडळींसाठीही आहे. आणि तो भगवान बुद्धांना अनुसरतो म्हणणाऱ्या आंबेडकरवादी मंडळींसाठीही आहे. क्रोध, द्वेष, शत्रुत्व, हिंसा यांना उत्तर प्रेम, करुणा, सेवा हेच आहे हा तो बोध आहे. ग्लॅडिसबाईंनी स्वतःच्या वागण्याने/निर्णयाने आपणा सर्वांसमोर हे उत्तर जिवंत स्वरूपात ठेवले आहे.

यासाठी आपण त्यांचे ऋणी आहोत.

***वसंत पळशीकर***



---

**लेखक-परिचय**

❖ **वेणु पळशीकर** : अर्थशास्त्र विषयाच्या निवृत्त प्राध्यापिका, 'नैसर्गिक शेती'चे प्रणेते मासानोबु फुकुओका यांच्या *वन स्ट्रॉ रेव्होल्युशन* या जगविख्यात ग्रंथाचे मराठी भाषांतर (*एका काडातून क्रांती*); अन्य प्रासंगिक लेखन. **पत्ता** : १५० गंगापुरी वाई ४१२ ८०३ (जि. सातारा).

❖ **प्रभाकर नानावटी** : केंद्र सरकारच्या आर्मामेंट रिसर्च प्रयोगशाळेत नोकरी; बुद्धिप्रामाण्यवादी, विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनामधून राजकीय-सामाजिक घडामोडींविषयी चिंतन व वृत्तपत्रीय लेखन. **पत्ता** : आर्मामेंट कॉलनी, औंध, पुणे ४११ ००७.

❖ **सुलोचना वाणी** : राष्ट्र सेवा दलामध्ये व्यक्तित्वाची जडणघडण; स्त्रियांची स्थिती, स्त्रियांचे प्रश्न यांच्या आस्थेवाईक अभ्यासक-कार्यकर्त्या. **पत्ता** : स्नेह, १४ महेशनगर, पिंपरी, पुणे.

❖ **विश्वास नाईकनवरे** : टाटा इकॉनॉमिक कन्सल्टन्सी सर्व्हिस मधील निवृत्त संशोधक; मानवेंद्रनाथ रॉय यांचे निष्ठावंत अनुयायी व त्यांच्या 'रॅडिकल ह्युमनिस्ट' चळवळीतील खंदे कार्यकर्ते-प्रचारक. **पत्ता** : सकाळनगर, बाणेर रस्ता, औंध, पुणे ४११ ००७.

अनुक्रमणिका








*"जोपर्यंत, हे आनंदा, वज्जी वारंवार सभा घेत रहातील आणि त्यांत बहुसंख्येने उपस्थित रहात जातील तोपर्यंत वज्जींची भरभराटच होईल, त्यांची अवनती होणार नाही."*

(ह्याच स्वरूपाचे प्रश्न भगवान बुद्ध आनंदाला करतात, ह्याच स्वरूपाची उत्तरे त्यांना आनंदाकडून मिळतात आणि इत्तर कोणत्या अटींचे पालन वज्जींनी केले तर त्यांचे कल्याण होईल हे बुद्ध असे स्पष्ट करतात :)

*"आनंदा, जोपर्यंत वज्जी सुसंवादाने एकत्र येतात, सुसंवादाने (बैठकीनंतर) एकमेकांचा निरोप घेतात आणि जे करण्याचे ठरविले असेल ते सुसंवादाने पार पाडतात, जे पूर्वीपासून चालत आलेले नाही ते करण्याचा निर्णय जोपर्यंत वज्जी घेत नाहीत, किंवा जे चालत आलेले आहे ते न करण्याचा निर्णय वज्जी घेत नाहीत, पूर्वी प्रस्थापित झालेल्या आपल्या प्राचीन संस्थांना (वज्जीधम्मांना) अनुसरून जोपर्यंत ते वागतात, जोपर्यंत आपल्यातील वृद्धांचा ते सत्कार करतात, त्यांचा गौरव करतात, त्यांचा मान राखतात, त्यांच्याविषयी पूज्यभाव बाळगतात, त्यांचे म्हणणे ऐकून घेणे आपले कर्तव्य आहे असे मानतात, जोपर्यंत ते कुलस्त्रियांना आणि कन्यांना बळजबरीने डांबून ठेवत नाहीत किंवा पळवून नेत नाहीत, जोपर्यंत ते नगरांत किंवा ग्रामीण प्रदेशात असलेल्या आपल्या चैत्यांचा[४] आदर करतात, त्यांचा गौरव करतात, त्यांचा मान राखतात, त्यांच्याविषयी पूज्यभाव बाळगतात, त्यांची निगा राखतात, पूर्वीपासून चालत आलेले विधी, किंवा (देवतांना द्यावयाचे) बली ह्यांची हेळसांड होऊ देत नाहीत, जोपर्यंत त्यांच्यात जे अर्हत् असतील त्यांना वज्जी यथायोग्य संरक्षण देतील आणि त्यांची संभावना करतील आणि यामुळे दुरवरून अर्हत् त्यांच्या राज्यात येत रहातील आणि राज्यात असलेले अर्हत् आनंदाने रहातील – (हे सर्व जोपर्यंत होत राहील तोपर्यंत) वज्जींची अवनती होणार नाही, त्यांची भरभराट होईल."*

५) मग ब्राह्मण वस्सकाराला उद्देशून भगवान म्हणाले, *"हे ब्राह्मणा, जेव्हा मी वेशालीला सारन्दद मंदिरात[५] रहात होतो तेव्हा मी वज्जींना हा सप्ताङ्ग कल्याणप्रद धर्म शिकविला. आणि जोपर्यंत वज्जींमध्ये हा सप्ताङ्ग कल्याणप्रद धर्म टिकून आहे, जोपर्यंत ह्या सप्ताङ्ग धर्माची शिकवण त्यांनी चांगल्या प्रकारे आकलन केली आहे तोपर्यंत त्यांची भरभराटच होईल, हानी होणार नाही."*

*ह्यावर तो मगधाचा महा-आमात्य ब्राह्मण वस्सकार* भगवन्तांना म्हणाला, "जोपर्यंत वज्जी ह्या धर्मातील एकाही नियमाचे पालन करीत आहेत तोपर्यंत त्यांचे कल्याणच होईल, हानी होणार नाही, असेच म्हणावे लागेल; मग जर ते ह्या सातही नियमांचे पालन करीत असतील तर काय सांगावे? तेव्हा, हे गौतमा, मगधाचा राजा अजातशत्रू वैदेहीपुत्र वज्जींवर मात करू शकणार नाही; म्हणजे कुटिल मार्गाचा, भेदनीतीचा अवलंब न करता युद्धात त्यांचा पराभव करू शकणार नाही. असो. गौतमा, आता आम्ही निरोप घेतो, आम्हाला खूप कामे करायची आहेत, खूप कामे पडली आहेत."

*"ब्राह्मणा, तुला जे सुयोग्य वाटते ते अवश्य कर."*

आणि तो ब्राह्मण वस्सकार भगवन्तांच्या ह्या शब्दांनी आनन्दित होऊन, प्रमोदित होऊन आसनावरून उठला आणि त्याने गमन केले.

६) तो गेल्यानंतर, थोड्याच वेळाने भगवन्त आयुष्मान आनंदाला उद्देशून म्हणाले, *"आनंदा, तू आता जा आणि राजगृहाच्या जवळपास जेवढे भिक्षू रहात आहेत त्यांना उपट्ठानशालेत[६] गोळा कर."* "जसे आपण म्हणता," असे म्हणून त्या आयुष्मान् आनंदाने राजगृहाच्या जवळपास रहात असलेल्या सर्व भिक्षूंना उपट्ठानशालेत गोळा केले. नंतर तो भगवन्तांकडे गेला, त्यांना त्याने अभिवादन केले आणि म्हणाला, "भन्ते, भिक्षुसंघ एकत्र जमला आहे. आपल्या इच्छेप्रमाणे आपण करावे."

मग भगवान आसनावरून उठले आणि उपट्ठानशालेत गेले. आणि आसनावर बसून ते म्हणाले,

*"भिक्षू हो! संघाचे कल्याण करणाऱ्या सात धर्मांचा मी तुम्हाला उपदेश करतो. मी बोलेन हे आपण लक्षपूर्वक ऐकावे, त्याच्याकडे ध्यान द्यावे."*

"होय, भन्ते! आपल्या आदेशाबाहेर आम्ही नाही." ते भिक्षू म्हणाले.

भगवान म्हणाले,

*"भिक्षू हो, जोपर्यंत भिक्षु वारंवार सभा घेतील व सभांमध्ये बहुसंख्येने उपस्थित रहातील तोपर्यंत त्यांची उन्नतदशा असेल अशीच अपेक्षा राहील, त्यांची अवनती होणार नाही.*

*"भिक्षू हो, तसेच, जोपर्यंत भिक्षू जे पूर्वी झालेले नाही असे काही प्रस्थापित करणार नाहीत, जे पूर्वी आज्ञापित झाले आहे त्याचा उच्छेद करणार नाहीत आणि जोपर्यंत सध्या संघाचे जे नियम घालून दिलेले आहेत त्यांना अनुसरून वागत*

रहातील, तोपर्यंत त्यांची उन्नतीच होईल, हानी होणार नाही.

"भिक्षू हो, तसेच, जोपर्यंत भिक्षू, अनुभवाने आणि दीर्घ साधनेने ज्येष्ठ असलेल्या, संघाला पितृस्थानी असलेल्या व संघाचे नायक असलेल्या भिक्षूंचा सत्कार करतील, त्यांचा गौरव करतील, त्यांचा सन्मान करतील, त्यांच्याविषयी पूज्यभाव धारण करतील, त्यांचे म्हणणे ऐकणे हे आपले कर्तव्य आहे असे मानतील, तोपर्यंत त्यांची उन्नतीच होईल, हानी होणार नाही.

"भिक्षू हो, तसेच, जोपर्यंत भिक्षू पुनर्भव (पुनर्जन्म) निर्माण करणारी तृष्णा जेव्हा उत्पन्न होते तेव्हा तिला वश होत नाहीत तोपर्यंत त्यांची उन्नतीच होईल अशी अपेक्षा राहील, अवनती होणार नाही."

"भिक्षू हो, तसेच, जोपर्यंत भिक्षू आपल्या मनाला असे वळण लावतील की साधू वृत्तीचे परिव्राजक आपल्याकडे येत रहावेत आणि जे येतील ते आपल्यासमवेत समाधानाने रहावेत, तोपर्यंत त्यांची उन्नतीच होईल अशी अपेक्षा राहील, अवनती होणार नाही.

"भिक्षू हो, तसेच, जोपर्यंत भिक्षू एकांतवासात रमतात तोपर्यंत त्यांची उन्नतीच होईल अशी अपेक्षा राहील, अवनती होणार नाही.

"भिक्षू हो, जोपर्यंत हे सात कल्याणकारी धर्म भिक्षूंमध्ये वसत असतील, जोपर्यंत ह्या सात कल्याणकारी धर्मांचे त्यांचे आकलन चांगले असेल तोपर्यंत भिक्षूंची उन्नतीच होईल अशी अपेक्षा राहील, अवनती होणार नाही."

७) "भिक्षू हो, आणखी सात कल्याणकारी धर्मांची शिकवण मी तुम्हाला देतो. आपण ती लक्षपूर्वक ऐकावी, तिच्याकडे ध्यान द्यावे. आता मी बोलतो."

भिक्षूंनी ते मान्य केले आणि मग भगवान म्हणाले,

"जोपर्यंत भिक्षू व्यापारधंद्यात गुंतणार नाहीत, व्यापार-धंद्याशी ते संबंध ठेवणार नाहीत,

"जोपर्यंत भिक्षूंना रिकामटेकड्या गप्पागोष्टी करण्याची सवय असणार नाही, अशा गप्पागोष्टींची त्यांना आवड असणार नाही, त्यांच्यात ते भाग घेत असणार नाहीत,

"जोपर्यंत भिक्षूंना आळशीपणाची चटक लागलेली नसेल, जोपर्यंत त्यांना आळस आवडत नसेल, आळसात ते काळ घालवीत नसतील,

"जोपर्यंत भिक्षू उगाच चारचौघात जाऊन मिसळणार नाहीत, (त्यांच्यासोबत वेळ वाया घालवणार नाहीत,) अशा गोष्टीची त्यांना आवड नसेल, अशा गोष्टीत ते रमणार नाहीत,

"जोपर्यंत त्यांना पापी इच्छा होणार नाहीत, पापी इच्छांना ते वश होणार नाहीत,

"जोपर्यंत ते पापी लोकांशी मैत्री करणार नाहीत, त्यांची संगत धरणार नाहीत, त्यांच्याशी जवळचा संबंध ठेवणार नाहीत,

"जोपर्यंत (निर्वाणाच्या मार्गावर असताना) काही विशेष अशा पण (निर्वाणाहून) कनिष्ठ असलेल्या गोष्टींचा लाभ झाला म्हणून वाटेत थांबणार नाहीत,

"तोपर्यंत भिक्षूंची अवनती होणार नाही अशी अपेक्षा राहील, उन्नतीच होईल.

"भिक्षू हो, जोपर्यंत हे सात कल्याणप्रद धर्म भिक्षूंमध्ये वसत असतील, जोपर्यंत ह्या सात कल्याणप्रद धर्मांचा उपदेश भिक्षूंना होत राहील तोपर्यंत भिक्षूंची अवनती होणार नाही अशी अपेक्षा राहील, उन्नतीच होईल."

८) "भिक्षू हो, आणखी सात कल्याणप्रद धर्मांचा उपदेश मी तुम्हाला करतो. आपण तो लक्षपूर्वक ऐकावा, त्याच्याकडे ध्यान द्यावे. आता मी बोलतो."

त्यांनी अनुमती दिल्यावर बुद्ध म्हणाले,

"जोपर्यंत भिक्षू श्रद्धावान असतील, (कुकर्माविषयी) त्यांना लज्जा असेल, कुकर्माची घृणा असेल, बहुश्रुत असतील, दृढपणे प्रयत्नशील असतील, एकाग्रचित्त असतील, प्रज्ञावन्त असतील तोपर्यंत त्यांची उन्नतीच होईल, अवनती होणार नाही.

"जोपर्यंत हे कल्याणप्रद सात धर्म भिक्षूंमध्ये वसत असतील, जोपर्यंत ह्या सात कल्याणप्रद धर्मांचा त्यांना उपदेश होत राहील तोपर्यंत, भिक्षूंनो, भिक्षूंची अभिवृद्धीच होईल अशी अपेक्षा राहील, हानी होणार नाही."

९) "हे भिक्षूंनो, आणखी सात कल्याणप्रद धर्मांचा उपदेश मी तुम्हाला करतो. तो लक्षपूर्वक ऐका, त्याच्याकडे ध्यान द्या. मी बोलतो."

त्यांनी अनुमती दिल्यावर बुद्ध म्हणाले,

"जोपर्यंत भिक्षू संबोधीच्या (उच्चतम प्रज्ञानाच्या) सात अंगांविषयी प्रयत्नशील रहातील – म्हणजे मानसिक जागरुक-पणाविषयी प्रयत्नशील रहातील – धर्मविषयक विवेचनाविषयी प्रयत्नशील रहातील, उत्साहाविषयी (आत्मबलाविषयी) प्रयत्नशील रहातील, आनंदाविषयी प्रयत्नशील रहातील, मनः-










*शांतीविषयी प्रयत्नशील रहातील, समाधीविषयी प्रयत्नशील रहातील, मनाच्या समधाततेविषयी प्रयत्नशील रहातील, तोपर्यंत त्यांची अभिवृद्धीच होईल, हानी होणार नाही."*

*"जोपर्यंत भिक्षू ह्या सात कल्याणकारी धर्मांचे पालन करीत रहातील, त्यांचा उपदेश त्यांना होत राहील तोपर्यंत त्यांची अभिवृद्धीच होत राहील, हानी होणार नाही."*

*१०) "भिक्षू हो, आणखी सात कल्याणकारी धर्मांचा उपदेश मी तुम्हाला करतो. तुम्ही तो नीट ऐका, त्याच्याकडे ध्यान द्या. मी बोलतो."*

त्यांनी अनुमती दिल्यावर बुद्ध म्हणाले,

*"जोपर्यंत भिक्षू प्रयत्नपूर्वक, सम्यक् दृष्टीला ज्ञात होणाऱ्या (सात) तत्त्वांचे चिंतन करीत रहातील, म्हणजे (हे सर्व) अनित्य आहे, आत्मा असा कुणी नाही, अशुभ (दुष्ट) विचार मनात येत रहातात, पापाचे भय बाळगले पाहिजे, अशुद्ध विचार सोडून दिले पाहिजेत, वैराग्य साधले पाहिजे, निर्वाण प्राप्त करून घेतले पाहिजे ह्या चिंतनात मग्न रहातील तोपर्यंत त्यांची अभिवृद्धीच होईल अशी अपेक्षा राहील, हानी होणार नाही.*

*"जोपर्यंत भिक्षू ह्या सात कल्याणकारी धर्मांचे पालन करीत रहातील आणि त्यांचा उपदेश त्यांना होत राहील तोपर्यंत त्यांची अभिवृद्धीच होईल अशी अपेक्षा राहील, हानी होणार नाही."*

*११) "भिक्षू हो, सहा कल्याणप्रद धर्मांचा उपदेश मी तुम्हाला करतो. तुम्ही तो नीट ऐका, त्याच्याकडे ध्यान द्या. मी बोलतो."*

त्यांनी अनुमती दिल्यावर भगवान् म्हणाले,

*"भिक्षू हो, जोपर्यंत भिक्षू साधूंच्या संघात उघडपणे किंवा एकांतात मैत्रीपूर्ण (कनवाळू) कायिक कृत्ये करीत रहातील, जोपर्यंत ते साधूंच्या संघात उघडपणे किंवा एकांतात मैत्रीपूर्ण वाचिक कर्मे करीत रहातील, मैत्रीपूर्ण मानसिक कर्मे करीत रहातील, धर्माप्रमाणे (संघाच्या नियमांप्रमाणे) जे लाभलेले आहे ते सर्व – भिक्षापात्रात जे अन्न पडले असेल तेथपर्यंतचे सर्व – ते जोपर्यंत शीलवंत साधूंबरोबर भेदभाव न करता विभागून घेत रहातील, अशा सर्वांबरोबर त्यात सहभागी होतील, जोपर्यंत ते साधूंबरोबर राहून अखंड (जी भग्न पावलेली नाही अशा), अच्छिद्र (ज्यांत उणीवा नाहीत अशा), जी डागळलेली नाहीत व निर्दोष आहेत अशा शीलांचे, उघड्यावर आणि एकांतात, आचरण करीत रहातील, प्रज्ञावन्त ज्या शीलांची प्रशंसा करतात, भावी (मरणोत्तर) जीवनाच्या आकांक्षेन किंवा बाह्य कर्मे (विधी, पूजा-अर्चा, इ.) फलदायी ठरतात ह्या विश्वासाने जी कलंकित झालेली नसतात आणि उच्च आणि पवित्र विचारांना जी पोषक असतात, ज्या शीलांचे आचरण, माणसाला मुक्त करते अशा शीलांचे आचरण भिक्षू जोपर्यंत करीत रहातील, तसेच जोपर्यंत भिक्षू साधूंबरोबर रहातील, उघड्यावर किंवा एकांतात श्रेष्ठ आणि विमोचक श्रद्धेचे, दुःखाचे पूर्णपणे निरसन करणाऱ्या श्रद्धेचे संवर्धन करतील, तोपर्यंत त्यांची अवनती होणार नाही अशी अपेक्षा राहील, त्यांची अभिवृद्धीच होईल.*

*"जोपर्यंत हे कल्याणप्रद सहा धर्म भिक्षूंमध्ये वसत असतील, जोपर्यंत त्यांचा उपदेश भिक्षूंना होत राहील तोपर्यंत त्यांची अवनती होणार नाही अशी अपेक्षा राहील, अभिवृद्धीच होईल."*

१२) तेथे राजगृहात गृध्रकूट पर्वतावर रहात असताना भगवन्तांनी शील, समाधी आणि प्रज्ञा ह्यांच्याविषयी भिक्षूंना दीर्घ प्रवचन केले. *"शीलसंपन्न अशी समाधी अत्यंत फलदायी, अत्यंत लाभदायी असते, समाधीसंपन्न अशी प्रज्ञा अत्यंत फलदायी, अत्यंत लाभदायी असते, प्रज्ञासंपन्न असे चित्त कामासव (वासनांचा मोह), भवासव (विशिष्ट व्यक्ती म्हणून अस्तित्वात टिकून रहाण्याचा मोह) आणि अविद्यासव ह्या आसवांपासून पूर्णपणे मुक्त होते."*

१३) राजगृहात आपल्या इच्छेप्रमाणे राहून भगवन्तांनी आयुष्मान आनंदाला म्हटले, "चल, आनंदा, आपण अंबलट्ठिकेला जाऊ." "भन्ते, आपण म्हणता तसे," असे आयुष्मान आनंद भगवन्तांना म्हणाला. मग भगवान भिक्षूंच्या मोठ्या संघासमवेत अंबलट्ठिकेला गेले.

१४) तेथे भगवन्त राजवाड्यात राहिले. त्यांनी भिक्षूंना शील, समाधी आणि प्रज्ञा यांच्याविषयी दीर्घ उपदेश केला. *"शीलसंपन्न अशी समाधी अत्यंत फलदायी, अत्यंत लाभदायी असते, समाधिसंपन्न अशी प्रज्ञा अत्यंत फलदायी, अत्यंत लाभदायी असते, प्रज्ञासंपन्न असे चित्त कामासव, भवासव, अविद्यासव ह्या आसवांपासून पूर्णपणे मुक्त होते."*

१५) अंबलट्ठिका येथे आपल्या इच्छेप्रमाणे राहिल्यानंतर भगवान आयुष्मान आनंदाला म्हणाले, "चल, आनंदा, आपण नालंदाला जाऊ." "जशी आपली इच्छा," आनंदा म्हणाला.

मग भगवन्त भिक्षूंच्या मोठ्या संघासमवेत नालंदा येथे गेले. तेथे भगवान पावारिक या आम्रवनात राहिले.

१६) मग आयुष्मान सारिपुत्त भगवन्त जेथे होते तेथे आले, त्यांना अभिवादन करून मर्यादशील रीतीने त्यांच्याजवळ बसले आणि म्हणाले, "भन्ते, भगवन्तांच्या ठिकाणी माझी एवढी श्रद्धा आहे की, मला असे वाटते की, भगवन्तांहून थोर, प्रज्ञावान असलेला, ज्याला (अंतिम) संबोधी प्राप्त झाली आहे असा श्रमण किंवा ब्राह्मण पूर्वी कधी नव्हता, पुढे कधी होणार नाही किंवा आताही कुठे असणार नाही."

*"तुझे शब्द उदार आणि धीट आहेत, सारिपुत्ता. खचित, त्यांच्यांतून तू उत्कट आनंदाचा उद्‌गार काढला आहेस! अर्थात् आतापर्यंत लोटलेल्या दीर्घ काळात जे अर्हत् होऊन गेले, ज्यांना सम्यक् संबोधी प्राप्त झाली त्या सर्व भगवन्तांशी तुझा परिचय असणार, त्यांची अंतःकरणे कशी होती हे तू आपल्या अंतःकरणाने जाणले असणार, त्यांचे आचरण कसे होते, त्यांची दृष्टी काय होती, प्रज्ञा कशी होती, जीवनसरणी कशी होती, कोणत्या प्रकारची मुक्ती त्यांना मिळाली, हे सारे तू आपल्या अंतःकरणाने जाणले असणार."*

"असे नाही भन्ते."

*"मग काय, दीर्घ भावी युगांत जे अर्हत् बुद्ध होतील, ज्यांना सम्यक् संबोधी प्राप्त झाली असेल त्या सर्व भगवन्तांशी तुझा परिचय असणार, त्यांची अंतःकरणे कशी होती हे तू आपल्या अंतःकरणाने जाणले असणार, त्यांचे आचरण कसे होते, त्यांची दृष्टी काय होती, प्रज्ञा कशी होती, जीवनसरणी कशी होती, कोणत्या प्रकारची मुक्ती त्यांना लाभली, हे सारे तू आपल्या अंतःकरणाने जाणले असणार."*

"असे नाही, भन्ते."

*"मग, निदान, मला तू आजच्या काळातील अर्हत् बुद्ध म्हणून ओळखतोस, तर आपल्या चित्ताने माझे चित्त अवगत करून घेऊन माझे आचरण कसे आहे, दृष्टी काय आहे, प्रज्ञा कशी आहे, जीवनसरणी कशी आहे, कोणत्या प्रकारची मुक्ती मी साधली आहे हे सर्व तू जाणले असणार."*

"असे पण नाही, भन्ते!"

*"मग पहा, सारिपुत्ता, भूतकालातील आणि भावी कालातील जे अर्हत् बुद्ध होऊन गेले आणि होतील, ज्यांना सम्यक् संबोधी प्राप्त झाली असेल त्यांचे अंतःकरण तू ओळखीत नाहीस. मग तुझे बोलणे इतके उदार आणि धीट का? सिंहनादासारखा आनंदभरित उत्कट उद्‌गार तू कशाला काढतोस की, 'भन्ते! भगवन्ताहून थोर, आणि प्रज्ञावान असलेला, ज्याला अंतिम सम्बोधी प्राप्त झाली आहे असा श्रमण किंवा ब्राह्मण पूर्वी कधी नव्हता आणि पुढे कधी होणार नाही आणि आताही अन्यत्र कुठे असणार नाही.' "*

"भन्ते! मला पूर्वी होऊन गेलेल्या आणि पुढे होतील अशा किंवा आता असलेल्या, ज्यांना सम्यक् संबोधी प्राप्त झाली आहे अशा अर्हत् बुद्धांच्या अंतःकरणांचे ज्ञान नाही. पण मला धर्माची परंपरा माहीत आहे. एखाद्या राज्याच्या सीमेवर मजबूत पायावर उभारलेले नगर असावे; त्याचे तट आणि तोरणे भक्कम असावीत आणि त्याला एकच प्रवेशद्वार असावे. आणि सर्व अपरिचित माणसांना रोखून फक्त मैत्रीच्या भावनेने आलेल्यांना प्रवेश देण्यासाठी एका हुशार, चलाख आणि शहाण्या पहारेकऱ्याची तेथे नेमणूक केली असावी. आता हा पहारेकरी सबंध शहराभोवती गस्त घालीत असताना, शहराकडे येणाऱ्या सर्व वाटांवर देखरेख करीत असताना, त्या तटांना असलेल्या सर्व भेगांचे व छिद्रांचे, ज्यातून फारतर एखादे मांजर काय ते आतबाहेर जाऊ शकेल अशा सर्व भेगांचे व छिद्रांचे ज्ञान त्याला होऊ शकणार नाही, असे असणे अगदी शक्य आहे. पण त्याच्याहून मोठ्या आकारमानाचा प्राणी जर नगरात शिरला किंवा नगरातून बाहेर गेला तर त्याला त्या प्रवेशद्वारातूनच तसे करावे लागेल. भन्ते, मला ह्याच प्रकारे धर्माची परंपरा माहीत आहे. मला हे माहीत आहे की ज्यांना सम्यक् संबोधी प्राप्त झाली होती असे जे अर्हत् बुद्ध होऊन गेले आहेत त्यांनी लोभ (किंवा काम), द्वेष, आळस, अहंकार आणि संशय (विचिकित्सा) हे दोष बाजूला सारून, ज्या मानसिक दोषांमुळे माणूस दुबळा बनतो त्यांचे ज्ञान करून घेऊन, (मनात उद्‌भवणाऱ्या विकारांविषयी) चार प्रकारच्या जागरुकपणाचे प्रशिक्षण मनाला देऊन, बोधीच्या सात अंगांचे यथार्थ ज्ञान प्राप्त करून घेऊन अत्युच्च ज्ञान (सम्यक् संबोधी) साधले होते. भावी काळात जे अर्हत् बुद्ध अत्युच्च सम्यक् संबोधी प्राप्त करून घेतील ते ह्याच मार्गाने ती प्राप्त करून घेतील. आणि मला माहीत आहे की, आजच्या काळातील जे अर्हत् बुद्ध आपण आहात त्यांनी ह्याच मार्गाने ती प्राप्त करून घेतली आहे."

१७) तेथे पावारिक आंबराईत राहिलेल्या भगवन्तांनी भिक्षूंना शील, समाधी आणि प्रज्ञा यांच्याविषयी विस्तृत उपदेश केला. *"जेव्हा समाधी शीलाने परिवर्धित होते तेव्हा महान् फळ मिळते, महान् लाभ होतो. जेव्हा समाधी प्रज्ञेने परिवर्धित*

अनुक्रमणिका

*होते तेव्हा महान् फळ मिळते, महान् लाभ होतो. प्रज्ञेने परिवर्धित झालेले चित्त आसवांपासून मुक्त होते - कामासव, भवासव, अविद्यासव."*

१८) आपली इच्छा होती तोपर्यंत भगवान नालंदा येथे राहिले आणि मग आयुष्मान आनंदाला म्हणाले, "चल, आनंदा, आपण पाटलिग्रामाला जाऊ."

"भन्ते, जशी आपली इच्छा," आनंद म्हणाला.

भिक्षूंच्या मोठ्या समुदायासोबत भगवान पाटलिग्रामाला गेले. पाटलिग्रामातील अनुयायांनी जेव्हा त्यांच्या आगमनाची वार्ता ऐकली तेव्हा भगवान जेथे होते तेथे ते गेले, त्यांना अभिवादन करून त्यांच्याजवळ बसले आणि भगवन्तांनी गावाच्या विश्रामगृहात रहावे असे आमंत्रण त्यांना केले. भगवन्तांनी मौनाने आपली संमती दर्शविली. मग, भगवन्तांनी आपली संमती दिली आहे हे जाणून, पाटलिग्रामातील उपासक आपल्या आसनांवरून उठले आणि त्यांना अभिवादन करून, प्रदक्षिणा घालून विश्रामगृहाकडे गेले. त्यांनी तेथे सर्व प्रकारच्या सोयी केल्या, आसने ठेवली, तेथे एक पाण्याचा घडा आणि तैलदीप ठेवला. मग ते भगवन्तांकडे परतले आणि त्यांना अभिवादन करून त्यांच्याजवळ उभे राहिले, आणि म्हणाले, "भन्ते, विश्रामगृहात सर्व तयारी आहे. आपल्याला समयोचित वाटेल तसे आपण करावे."

मग भगवन्तांनी चीवर परिधान केले, आपले भिक्षापात्र आणि इतर वस्तू घेतल्या आणि भिक्षूंबरोबर ते विश्रामगृहाकडे गेले. तेथे आल्यावर त्यांनी पाय धुतले आणि सभागृहात प्रवेश केला. सभागृहाच्या मध्यभागी जो खांब होता त्याला टेकून, पूर्वेकडे तोंड करून ते बसले. त्यांच्यासोबत असलेल्या भिक्षूंनीही पाय धुऊन सभागृहात प्रवेश केला आणि पश्चिमेकडल्या भिंतीला टेकून, पूर्वाभिमुख होऊन ते भगवन्तांभोवती बसले. पाटलिग्रामातील उपासकांनीही पाय धुऊन सभागृहात प्रवेश केला आणि पूर्वेकडील भिंतीला टेकून, पश्चिमाभिमुख होऊन, ते भगवन्तांसमोर बसले.

१९) मग भगवन्त पाटलिग्रामाच्या उपासकांना उद्देशून म्हणाले,

*"हे गृहपतींनो, दुःशील माणसाला त्याच्या शीलभ्रष्टतेमुळे पाच आपत्ती सहन कराव्या लागतात. कोणत्या पाच? दुःशील माणूस शीलभ्रष्टतेमुळे मोठ्या विपन्नावस्थेत, दारिद्र्यात सापडतो. दुसरे असे की, त्याच्या पापांची दुष्कीर्ती दूरवर पसरते. तिसरी गोष्ट अशी की, जेव्हा तो ब्राह्मणांच्या, क्षत्रियांच्या, गृहपतींच्या किंवा श्रमणांच्या समाजात जातो तेव्हा तो शरमिंदा आणि गोंधळलेला असतो. तसेच मृत्यूच्या समयी तो मोठ्या आशङ्केने व्यथित असतो. आणि, शेवटी असे की, मरणानंतर तो दुर्गतीला किंवा नरकाला जातो. गृहपती हो, दुःशील, शीलभ्रष्ट माणसाची अशी पाच प्रकारची हानी होते.*

*२०) "गृहपती हो, सच्छील माणसाचे त्याच्या शीलसंपन्नतेमुळे पाच लाभ होतात. कोणते पाच? एक तर सच्छील, शीलसंपन्न माणूस त्याच्या उद्योगीपणामुळे खूप संपत्ती मिळवतो. दुसरे असे की, त्याची ख्याती दूरवर पसरते. तिसरी गोष्ट अशी की, तो कोणत्याही समाजात, ब्राह्मणांच्या, क्षत्रियांच्या, गृहपतींच्या किंवा श्रमणांच्या समाजात, आत्मविश्वासाने, धीरवृत्तीने प्रवेश करतो. चवथे असे की, मृत्यूच्या वेळी तो अनायासाने मरतो. शेवटी असे की, शरीराचे विसर्जन होते तेव्हा, मरणानंतर त्याला सद्गती प्राप्त होते, तो स्वर्गाला जातो.*

*"गृहपती हो, शीलवान, शीलसंपन्न माणसाला हे पाच लाभ होतात."*

२१) भगवन्तांनी अशा प्रकारे पाटलिग्रामाच्या उपासकांना बऱ्याच रात्रीपर्यंत धर्माविषयी उपदेश करून त्यांना उत्तेजित, जागृत केल्यावर आणि प्रसन्न केल्यावर ते त्यांना म्हणाले, "गृहपती हो, रात्र बरीच झाली आहे. आता आपली इच्छा असेल तसे करायला आपण मोकळे आहात."

"जशी आपली इच्छा, भन्ते!" पाटलिग्रामाचे ते उपासक म्हणाले. आणि आपल्या आसनांवरून उठून भगवन्तांना अभिवादन करून, त्यांना प्रदक्षिणा घालून त्यांनी त्यांचा निरोप घेतला.

२२) त्यावेळी सुनिध आणि वस्सकार हे मगधाचे महाआमात्य पाटलिग्रामाचे वज्जींपासून संरक्षण करण्यासाठी तेथे एक कोट बांधीत होते. त्यावेळी सहस्रावधी देवता त्या भूमीवर रहात होत्या. जेव्हा अशा प्रदेशात शक्तिशाली देवता रहात असतात तेव्हा त्या, बलाढ्य राजांची आणि आमात्यांची मने वळवून त्यांना तेथे निवासस्थाने बांधायला लावतात. आणि मध्यम किंवा कनिष्ठ प्रतीच्या देवता, मध्यम किंवा कनिष्ठ प्रतीच्या राजांची किंवा आमात्यांची मने अशाच रीतीने वळवितात. भगवन्तांनी आपल्या दिव्य, विशुद्ध, अतिमानवी दृष्टीने पाटलिग्रामात वसलेल्या त्या सहस्रावधी देवता पाहिल्या. आणि उषःकाली उठून ते आयुष्मान आनंदाला म्हणाले, "आनंदा,

पाटलिग्रामाला भुइकोट कोण बांधीत आहे?"

"भन्ते, वज्जींचा प्रतिकार करण्यासाठी सुनिध आणि वस्सकार हे मगधाचे महा-आमात्य हा कोट बांधीत आहेत."

"आनंदा, जणू काय तावतिंस देवांचा सल्ला त्यांनी घेतला असावा अशा रीतीने मगधाचे महा-आमात्य सुनिध आणि वस्सकार वज्जींचा प्रतिकार करण्यासाठी पाटलिग्रामाला हा कोट बांधीत आहेत." (आपण ज्या देवता पाहिल्या त्यांचे, आणि विविध प्रकारच्या देवता निवासस्थाने बांधायला माणसांना कशा प्रकारे प्रवृत्त करतात त्याचे वर्णन करून, भगवान बुद्ध पुढे म्हणाले) *"कार्यमग्न माणसांच्या निवासस्थानांनी आणि व्यापारी पेढ्यांनी गजबजलेल्या प्रसिद्ध नगरांमध्ये हे पाटलिपुत्र नगर प्रमुख होईल, सर्व प्रकारच्या व्यापारी मालाच्या विनिमयाचे केंद्र ते होईल. पण तीन प्रकारच्या संकटांचे भय त्याला राहील – आगीचे भय, पाण्यापासून भय आणि अंतर्गत विसंवादाचे (यादवीचे) भय."*

२३) मग सुनिध आणि वस्सकार हे मगधाचे महा-आमात्य भगवन्त जेथे रहात होते तेथे आले. त्यांनी भगवन्तांना त्यांचे कुशल विचारले आणि भगवन्तांनीही त्यांचे कुशल विचारले. मग ते आदराने बाजूला उभे राहिले. अशा रीतीने उभे राहून, ते मगधाचे महा-आमात्य, सुनिध आणि वस्सकार, भगवन्तांना म्हणाले, "भगवान गौतमांनी, भिक्षुसंघासहित आमच्या घरी आज भोजन करण्याची कृपा करावी." भगवन्तांनी मौनाने आपली संमती दाखविली.

जेव्हा सुनिध आणि वस्सकार ह्या मगधाच्या महा-आमात्यांनी हे जाणले की भगवन्तांनी आपले आमंत्रण स्वीकारले आहे तेव्हा ते आपल्या घरी परतले. तेथे आल्यावर त्यांनी भाताची गोड पक्वान्ने शिजविली. आणि भोजनाची वेळ झाली आहे हे भगवन्तांना कळवायला ते भगवन्तांना म्हणाले, "हे गौतमा, भोजनाची वेळ झाली आहे, सर्व सिद्धता आहे."

भगवन्तांनी अविलंबेकरून चीवर परिधान केले, भिक्षापात्र घेतले आणि भिक्षूंच्या समुदायासमवेत ते सुनिध आणि वस्सकार यांच्या निवासस्थानी गेले, आणि त्यांच्यासाठी तयार केलेल्या आसनावर बसले. मग त्या सुनिध आणि वस्सकार यांनी, ज्याच्या अग्रस्थानी भगवान बुद्ध होते अशा त्या भिक्षुसमुदाया-समोर आपल्या हातांनी ती पक्वान्ने ठेवली आणि ते तृप्त होईपर्यंत त्यांना वाढले. भगवन्तांचे भोजन आटोपल्यावर त्या महा-आमात्यांनी एक कमी उंचीचे आसन आणले आणि आदरपूर्वक ते त्यांच्याजवळ बसले.

ते तसे आसनस्थ झाल्यावर भगवन्तांनी पुढील पद्यपंक्ती म्हटल्या :

*"जेथे कुठे पंडित वास करीत असेल*
*तेथे शीलवंत, संयत साधूंचे आतिथ्य त्याने करावे.*
*तेथे ज्या देवता असतील त्यांना दक्षिणा त्याने द्यावी.*
*त्यांचे पूजन त्याने केले, त्यांचा सन्मान केला तर*
*त्या त्याचे पूजन करतील, त्याचा सन्मान करतील.*
*आपल्या पोटी जन्माला आलेल्या एकुलत्या पुत्रावर माता माया करते,*
*तशी माया त्या त्याच्यावर करतील*
*देवतांचा अनुग्रह ज्याच्यावर असेल*
*तो आपले कल्याण झालेलेच नेहमी पाहील.*

आणि भगवन्तांनी, सुनिध-वस्सकार ह्या मगधाच्या महा-आमात्यांचे ह्या पंक्तींनी आभार मानल्यावर ते आसनावरून उठले आणि तेथून निघाले.

२४) सुनिध-वस्सकार त्यांच्यासोबत गेले आणि म्हणाले, "श्रमण गोतम ज्या द्वारातून आज बाहेर पडले त्याचे नाव 'गोतम-द्वार' असे ठेवले जाईल आणि ज्या तरीने ते गङ्गनदी पार करतील तिचे 'गोतम-तीर्थ' असे ठेवले जाईल."

भगवान ज्या द्वाराने बाहेर पडले त्याचे नाव 'गोतमद्वार' असे पडले आहे.

मग भगवन्त नदीकडे गेले. त्यावेळी गङ्गनदी पाण्याने भरली होती आणि दुथडी भरून वहात होती. ज्यांना नदी ओलांडून पलतडी जायचे होते त्यांतील काही नावा शोधू लागले, काही लाकडी तराफे शोधू लागले, काही वेताचे तराफे शोधू लागले. पण एखादा बळकट माणूस ज्याप्रमाणे क्षणार्धात आपला बाहू पसरतो किंवा क्षणार्धात पसरलेला बाहू मागे घेतो त्याप्रमाणे भगवन्त क्षणार्धात नदीच्या ह्या तीरावर दिसेनासे झाले आणि पलीकडच्या तीरावर, भिक्षु-समुदायासमवेत, उभे राहिले.

लोक नावा आणि तराफे शोधीत आहेत हे भगवन्तांनी पाहिले आणि हे पाहिल्यावर त्यांनी हे गीत म्हटले :

*"प्राकृत जन वेताचे तराफे बांधीत असताना,*
*घन, भक्कम सेतू आरपार बांधून*
*जे हा दुस्तर सागर तरून जातात*
*तेच खरे शहाणे, ते सागर उत्तीर्ण करतात."*






## दुसरा भाग

२५) मग भगवान आयुष्मान आनंदाला उद्देशून म्हणाले, "चल, आनंदा, आपण कोटिग्रामाला जाऊ या."

"भन्ते, जशी आपली इच्छा," असे म्हणून आनंदाने भगवन्तांच्या सूचनेला आपली अनुमती दाखविली. भगवन्त भिक्षूंच्या मोठ्या समुदायासमवेत कोटिग्रामला जायला निघाले आणि तेथे (पोचल्यावर) ते गावातच राहिले.

तेथे भगवन्त भिक्षूंना म्हणाले,

*"भिक्षूंनो, चार आर्यसत्ये समजून न घेतल्यामुळे, त्यांचे ग्रहण न केल्यामुळे आपल्याला, तुम्हाला आणि मला, संसाराच्या (जन्म-मरणाच्या) ह्या दीर्घ आणि श्रांत मार्गावरून इतका काळ पळावे लागत आहे, भ्रमण करावे लागत आहे.*

*"ही कोणती चार आर्यसत्ये?*

*"दुःखाविषयीचे आर्यसत्य; दुःखाच्या कारणाविषयीचे आर्यसत्य; दुःखनिरोधाविषयीचे (दुःखाच्या अंताविषयीचे) आर्यसत्य आणि ज्या मार्गाने दुःखनिरोध होतो त्याच्याविषयीचे आर्यसत्य. पण जेव्हा ह्या आर्यसत्यांचे ग्रहण होते, त्यांचे ज्ञान होते तेव्हा अस्तित्वाविषयीच्या तृष्णेचे निर्मूलन होते, ज्याच्यामुळे अस्तित्व नव्याने उदयाला येते त्याचा नाश होतो आणि मग पुनर्जन्म लाभत नाही."*

भगवन्त असे म्हणाले. आणि हे म्हटल्यानंतर सुगत (बुद्ध) पुढे म्हणाले,

*"चार आर्यसत्यांचे यथार्थ दर्शन न झाल्याने*
*अनेक जन्मांतून नेणारा मार्ग चोखाळावा लागतो.*
*जेव्हा त्यांचे ग्रहण होते, तेव्हा जन्माचे कारण उरत नाही.*
*दुःखाचे मूळ उच्छिन्न होते, मग पुनर्जन्म असत नाही."*

कोटिग्रामाला रहात असताना भगवंतांनी शील म्हणजे काय, समाधी म्हणजे काय, प्रज्ञा म्हणजे काय हे स्पष्ट करणारे धर्मविषयक विस्तृत प्रवचन भिक्षूंसाठी केले. *"शीलाने समृद्ध झालेल्या समाधीपासून मोठे फळ मिळते, मोठा लाभ होतो. समाधीने समृद्ध झालेल्या प्रज्ञेपासून मोठे फळ मिळते, मोठा लाभ होतो. प्रज्ञेने समृद्ध झालेले चित्त सर्व आसवांपासून मुक्त होते – कामासव, भवासव, अविद्यासव ह्या आसवांपासून."*

२६) कोटिग्राम् येथे आपल्या इच्छेनुसार पाहिजे तितका काळ राहिल्यानंतर भगवंत आयुष्मान आनंदाला म्हणाले, "चल, आनंदा, आपण नादिक गावाला जाऊ."

"भन्ते, जशी आपली इच्छा!" असे म्हणून आनंदाने भगवंतांच्या इच्छेला आपली अनुमती दाखविली. मग भगवंत भिक्षूंच्या मोठ्या समुदायासमवेत नादिक या खेडेगावाला गेले आणि तेथे विटांनी बांधलेल्या एका गृहात ते राहिले.

मग आयुष्मान् आनंद भगवंतांकडे गेला आणि त्यांना अभिवादन करून त्यांच्या शेजारी बसला. मग तो भगवंतांना म्हणाला, "भन्ते, साळ्ह नावाचा भिक्षू नादिक येथे मृत्यू पावला. त्याला कोणती गती मिळाली? त्याचे भवितव्य काय असेल? नंदा नावाची भिक्षुणी नादिकामध्ये दिवंगत झाली. तिला कोणती गती मिळाली? तिचे भवितव्य काय असेल? सुदत्त नावाचा उपासक नादिकात मरण पावला. त्याला कोणती गती मिळाली? त्याचे भवितव्य काय असेल? सुजाता नावाची उपासिका नादिकात मरण पावली. तिला कोणती गती मिळाली? तिचे भवितव्य काय असेल? ककुध, कालिंग, निकट, कटिस्सभ आणि तुट्ठ आणि संतुट्ठ, भद्द आणि सुभद्द हे उपासक असेच येथे मृत्यू पावले. त्यांना कोणती गती मिळाली. त्यांचे भवितव्य काय असेल?"

२७) *"आनंदा, साळ्ह भिक्षूने आसवांचा नाश करून स्वतःच ह्या लोकी ज्ञान आणि प्रज्ञा प्राप्त करून घेतली व तो अर्हत्-पदाला पोचला, त्याचे चित्त आणि प्रज्ञा मुक्त झाली. आनंदा, भिक्षुणी नंदा हिने, जे पाच बंध माणसांना ह्या जगाला बांधतात त्यांचा पूर्ण नाश केला, ती सर्वोच्च स्वर्गाला पोचली, तेथे तिला परिनिर्वाण लाभेल, ती ह्या जगात परतणार नाही. उपासक सुदत्ताने तीन बंधांचा पूर्ण नाश केला, काम, द्वेष आणि मोह (भ्रांती). ह्यांना अत्यंत क्षीण केले आणि तो 'सकदागामी'*[१] *पदाला पोचला. तो एकदाच ह्या लोकात परतून दुःखाचा अंत घडवून आणील. उपासिका सुजाता हिने, आनंदा, तीन बंधांचा पूर्ण नाश केला व ती स्रोतापन्नअवस्थेला पोचली (निर्वाणाकडे नेणाऱ्या मार्गावर स्थिर झाली); ती ह्या दुःखमय जगात परतणार नाही आणि तिला अंतिम निर्वाण निश्चितपणे प्राप्त होईल. आनंदा, उपासक ककुध याने माणसांना ह्या कनिष्ठ कामलोकाला जखडणाऱ्या पाच बंधांचा संपूर्ण नाश केला, तो उच्चतम स्वर्गाला गेला, तो परिनिर्वाण प्राप्त करून घेईल, तो ह्या लोकात परतणार नाही. कालिंग, निकट, कटिस्सभ,*





*तुट्ठ, संतुट्ठ, भद्द आणि सुभद्द आणि नादिकातील पन्नासाहून अधिक उपासकांची स्थिती अशीच आहे. नादिकातील मृत्यू पावलेले नव्वदाहून अधिक उपासक असे आहेत की त्यांनी जगाला बांधणाऱ्या तीन बंधांचा समूळ नाश केला आहे आणि काम, द्वेष आणि मोह ह्यांना अत्यंत क्षीण करून ते सकदागामी झाले आहेत; ते जगात परततील तेव्हा पहिल्याच पाळीत दुःखाचा अंत घडवून आणतील. नादिकातील पाचशेहून अधिक मृत्यू पावलेले उपासक असे आहेत की त्यांनी तीन बंधांचा नाश करून स्रोतापन्नभाव प्राप्त करून घेतला आहे. त्यांचा दुःखाच्या अवस्थेत पुनर्जन्म होणार नाही, त्यांना अंतिम संबोधी निश्चितपणे लाभणार.*

२८) *"आता, आनंदा, माणूस मरावा ह्यात आश्चर्यकारक असे काहीच नाही. पण कुणाच्याही बाबतीत असे घडले की तू, दरवेळी, तथागताजवळ येऊन अशी, त्याला शीण आणणारी चौकशी करावीस हे आश्चर्यकारक आहे. ह्यासाठी तुला सत्याप्रत नेणारा एक मार्ग सुचवितो; ह्याला सत्याचा आदर्श (आरसा) म्हणतात. बुद्धाच्या एखाद्या श्रेष्ठ शिष्याकडे जर हा आरसा असेल तर तो स्वतःच स्वतःविषयी असे भविष्य वर्तवू शकेल : 'माझ्या बाबतीत नरक नष्ट झाला आहे; एक (मानवेतर) प्राणी, किंवा पिशाच्च म्हणून पुनर्जन्म पावण्याची किंवा दुःखमय अवस्थेत परत जन्माला यायची शक्यता नाहीशी झाली आहे. मला स्रोतापन्नभाव प्राप्त झाला आहे; दुःस्थितीत परत जन्म घेण्याची पाळी माझ्यावर येणार नाही. मला निश्चितपणे संबोधी प्राप्त होईल.'*

*"आनंदा, हा धर्माचा आदर्श काय आहे? हा आदर्श म्हणजे ही जाणीव की बुद्धाच्या ह्या श्रेष्ठ शिष्याची बुद्धावर श्रद्धा आहे – की हा महान साधू आहे, त्याला अंतिम संबोधी प्राप्त झाली आहे, हा विद्यासंपन्न, आचरणसंपन्न आहे, सुगत (योग्य मार्गाने जाणारा) आहे, ह्या जगाचे ज्ञान त्याला आहे, हा सर्वश्रेष्ठ आहे, माणसांच्या मनोविकारांना आवरणारा सारथी आहे, देव आणि मनुष्य यांचा आचार्य आहे, हा भगवान बुद्ध आहे. आणि त्या श्रेष्ठ शिष्याची सत्यावर श्रद्धा असली पाहिजे की भगवान बुद्धाने सत्य काय हे घोषित केले आहे – ह्या जगात लाभदायक ठरणारे, अविनाशी असलेले, सर्वांचे स्वागत करणारे, निर्वाणाप्रत नेणारे, जिज्ञासू जे स्वतःच स्वतःसाठी जाणून घेऊ शकेल असे सत्य! आणि त्या श्रेष्ठ शिष्याची संघावर श्रद्धा असली पाहिजे, – भगवंताचे जे पुष्कळ शिष्य अष्टांग आर्यमार्गाच्या चार अवस्थांतून मार्गक्रमण करीत आहेत, धर्माचरण करण्याच्या, शुद्ध आचरणाच्या, न्यायी वृत्तीच्या, मर्यादांचे पालन करण्याच्या अवस्थांतून चालत आहेत त्यांच्यावर श्रद्धा असली पाहिजे. भगवंतांचा श्रावक संघ हा सन्माननीय, ज्याचे आतिथ्य करावे, ज्याला दान द्यावे, ज्याच्याविषयी पूज्यभाव बाळगावा असा आहे; तो म्हणजे ह्या जगातील सर्वश्रेष्ठ असे पुण्यक्षेत्र आहे यावर श्रद्धा असली पाहिजे. ह्या संघाकडे साधूंना प्रिय असलेले असे सद्‌गुण आहेत, अखंड (भग्न न पावलेले) छिद्रहीन, शबलित नसलेले, अदूषित असे सद्‌गुण, माणसांना खरोखर मुक्त करणारे, ज्ञानी जन ज्यांची प्रशंसा करतात असे सद्‌गुण, भावी जीवनाच्या आकांक्षेने, बाह्य कृती फलदायी ठरतात ह्या विश्वासाने जे कलंकित नसतात, उच्च आणि पवित्र विचारांना जे पोषक असतात असे सद्‌गुण भगवंतांच्या संघाच्या अंगी आहेत अशी त्यांच्या श्रेष्ठ शिष्यांची श्रद्धा असली पाहिजे.*

*"आनंदा, हा मार्ग आहे, सत्याचा हा आरसा आहे. जर माझ्या श्रेष्ठ शिष्याकडे हा असेल तर तो स्वतःच स्वतःविषयी असे भविष्य वर्तवू शकेल की 'माझ्याबाबतीत नरक नष्ट झाला आहे. प्राणी म्हणून, पिशाच्च म्हणून किंवा दुःखमय परिस्थितीत माझा पुनर्जन्म होणार नाही. मला स्रोतापन्नभाव प्राप्त झाला आहे. दुःस्थितीत मला फिरून जन्म लाभणार नाही; मला निश्चितपणे संबोधी लाभेल.' "*

नादिक येथील विटांनी बांधलेल्या त्या गृहात भगवंतांनी भिक्षूंना शील, समाधी आणि प्रज्ञा म्हणजे काय ह्याविषयी विस्तृत उपदेश केला. *"शीलाने समृद्ध झालेल्या समाधीपासून महान फळ मिळते, महान लाभ होतो. प्रज्ञेने समृद्ध झालेले चित्त कामासव, भवासव आणि अविद्यासव ह्या चिवट आसवांपासून मुक्त होते."*

३०) आपली इच्छा होती तोपर्यंत नादिक येथे राहून भगवान बुद्ध आयुष्मान आनंदाला म्हणाले, "चल, आनंदा, आपण वेसाली येथे जाऊ." "भन्ते, जशी आपली इच्छा," असे म्हणून आनंदाने आपली अनुमती दाखविली. मग भिक्षूंचा मोठा समुदाय सोबत घेऊन भगवन्त वेसाली येथे गेले व तेथे अम्बपालीच्या वनराईत ते राहिले.

तेथे भगवान भिक्षूंना उद्देशून म्हणाले,

*"भिक्षूंनो, भिक्षू सुजाण आणि सम्प्रज्ञ असावा. हा माझा तुम्हाला आदेश आहे.*










*"आणि भिक्षू सुजाण कसा होतो?*

*"भिक्षूंनो, भिक्षू जेव्हा शरीरात वसत असतो तेव्हा त्याने प्रयत्नशील, विचारशील, जागरूक राहून, जगात वावरत असताना, शरीराकडे अशा रीतीने पहावे की त्याला शारीरिक वासनांपासून उद्भवणाऱ्या दुःखावर पगडा मिळेल. जेव्हा त्याला संवेदना प्राप्त होत असतात तेव्हा त्याने प्रयत्नशील, विचारशील आणि जागरूक राहून संवेदनांकडे अशा रीतीने पहावे की त्याला संवेदनांपासून उद्भवणाऱ्या तृष्णेमुळे प्राप्त होणाऱ्या दुःखावर पगडा मिळेल; तसेच तो विचार करीत असताना, तर्क करीत असताना किंवा त्याच्या मनात भावना जागृत झाल्या असताना विचारापासून, तर्कापासून, भावनांपासून उद्भवणाऱ्या वासनांमुळे जे दुःख लाभते त्यावर त्याने पगडा मिळवावा.*

*"आणि, भिक्षूंनो, भिक्षू संप्रज्ञ कसा होतो?*

*"तो काहीही करीत असो, ते करताना, आपण काय करीत आहोत याकडे त्याचे संपूर्ण अवधान असते – बाहेर जाताना, आत येताना, पहाताना, निरीक्षण करताना, हात वाकविताना किंवा पसरताना, चीवर परिधान करताना किंवा भिक्षापात्र घेऊन जाताना, खाताना किंवा पिताना, भक्षण करताना किंवा रुची घेताना, झोपी जाताना किंवा जागे होताना, बोलताना किंवा मूक असताना आपण काय करीत आहोत त्याकडे संपूर्ण अवधान असते.*

*"भिक्षूंनो, भिक्षू अशा रीतीने सम्प्रज्ञ होतो.*

*"भिक्षूंनो, तुम्ही सुजाण आणि सम्प्रज्ञ असावे असा माझा तुम्हाला आदेश आहे."*

३१) आता, भगवान वेसालीला आले आहेत आणि आपल्या आंबराईत रहात आहेत असे अम्बपाली गणिकेने ऐकले. मग अनेक भव्य वाहने तयार ठेवण्याची आज्ञा तिने दिली आणि एका यानात बसून आपल्या अनुचरांसह ती त्या उपवनात गेली. जोपर्यंत जिच्यावरून वाहनात बसून जाता येईल अशी जमीन होती तोपर्यंत ती वाहनातून गेली. तेथे ती उतरली आणि जेथे भगवन्त होते तेथे ती चालत गेली. आणि भगवंतांना अभिवादन करून त्यांच्याजवळ बसली. ती अशी बसली असताना भगवंतांनी धर्माविषयी प्रवचन करून तिला उपदेश केला, उत्तेजित केले (विचारप्रवण व कृतिप्रवण केले). ती आनंदित झाली. भगवंतांचा उपदेश ग्रहण केल्याने उत्तेजित व आनंदित झालेल्या तिने भगवन्तांना उद्देशून म्हटले, "भन्ते, उद्या आपण भिक्षुसमुदायासमवेत माझ्या येथे भोजनासाठी येऊन मला सन्मानित करावे."

भगवन्तांनी स्तब्ध राहून आपली अनुमती दर्शविली. भगवन्तांनी अनुमती दिली आहे हे जेव्हा त्या अम्बपालि गणिकेने पाहिले तेव्हा ती आसनावरून उठली आणि भगवन्तांना प्रदक्षिणा घालून तेथून निघाली. आता भगवन्त वेसालीला आले आहेत व ते अम्बपालीच्या आंबराईत रहात आहेत हे वेसालीच्या लिच्छवींनी ऐकले. मग अनेक सुशोभित वाहने सज्ज करण्याची आज्ञा त्यांनी दिली व यानात आरूढ होऊन आपल्या अनुचरांसह ते वेसालीला निघाले. काही लिच्छवी श्यामवर्ण होते व त्यांनी श्यामल वस्त्रे आणि श्यामल अलंकार परिधान केले होते; काही पीत वर्णाचे होते व त्यांनी पीत वस्त्रे व पीत अलङ्कार परिधान केले होते. काही रक्तवर्णी होते व त्यांनी रक्त वस्त्रे व अलंकार परिधान केले होते; काही गौरवर्णी होते व त्यांनी शुभ्र वस्त्रे व अलंकार परिधान केले होते.

अम्बपालीचे वाहन (समोरून) येताना तरुण लिच्छवींच्या यानाला भिडले; आस आसाला, चाके चाकांना आणि जोखड जोखडाला भिडावे असे ते भिडले. ते लिच्छवी अम्बपाली गणिकेला म्हणाले, "अम्बपाली, तुझे यान आमच्या यानाला असे भिडले, असे कसे काय झाले?"

"आर्यपुत्रांनो, मी आताच भगवन्तांना आणि त्यांच्या भिक्षुसमुदायाला उद्या भोजनासाठी आमंत्रण केले आहे," ती म्हणाली. ते म्हणाले, "अम्बपाली, हे उद्याचे भोजन दशसहस्र नाण्यांसाठी आमच्याकडे दे."

"आर्यपुत्रांनो, समग्र वेसाली, तिच्या अंकित प्रदेशासह, जरी तुम्ही मला दिली तरी (भगवन्तांना) भोजन देण्याचा हा सन्मान मी आपल्याला देणार नाही."

मग त्या लिच्छवींनी हात उंचावून (आपण हरलो हे दाखविले) आणि ते म्हणाले, "पहा, ह्या आंबेवाल्या मुलीने आमच्यावर मात केली, ह्या आंबेवाल्या मुलीने आमच्यावर कडी केली." मग ते अंबपालीच्या आंबराईत गेले.

भगवन्तांनी त्यांना येताना दुरून पाहिले आणि ते भिक्षूंना म्हणाले, *"भिक्षू हो, ज्या भिक्षूंनी तावतिंस देवांना कधीही पाहिलेले नाही त्यांनी लिच्छवींच्या ह्या समुदायाकडे पहावे, लिच्छवींच्या ह्या समुदायाचे अवलोकन करावे, लिच्छवींच्या ह्या समुदायाची तुलना करावी – तावतिंस देवांच्या समुदायाशी तुलना करावी."*

अनुक्रमणिका






वाहनात बसून येण्याजोगी भूमी होती तोपर्यंत लिच्छवी वाहनात बसून गेले आणि नंतर भगवन्त जिथे होते तेथपर्यंत चालत गेले आणि त्यांच्या शेजारी आदरपूर्वक बसले. ते बसल्यानंतर भगवन्तांनी धर्माविषयी प्रवचन करून त्यांना उपदेश केला, त्यांना जागृत, आणि उत्तेजित करून उल्हसित केले. भगवंतांच्या प्रवचनातील उपदेश ग्रहण केलेले आणि त्याने जागृत, उत्तेजित आणि उल्हसित झालेले ते लिच्छवी भगवन्तांना उद्देशून म्हणाले, "भगवन्तांनी उद्या त्यांच्या भिक्षु-समुदायाबरोबर आमच्या घरी भोजन करून आमचा सन्मान करावा."

भगवन्तांनी उत्तर दिले, "लिच्छवी हो, अम्बपाली गणिकेच्या घरी उद्या भोजन करण्याचे वचन मी तिला दिले आहे." मग त्या लिच्छवींनी हात उंचावून म्हटले, "ह्या आंबेवाल्या मुलीने आमच्यावर मात केली, ह्या आंबेवाल्या मुलीने आमच्यावर कडी केली." मग भगवन्तांचे आभार मानून, त्यांनी केलेल्या उपदेशाला अनुमोदन देऊन, भगवन्तांना नम्रपणे प्रणाम करून, प्रदक्षिणा घालून ते तेथून निघाले.

३२) मग रात्र संपत आली तेव्हा त्या अम्बपाली गणिकेने आपल्या प्रासादात गोड भात आणि इतर पक्वान्ने शिजविली आणि भगवन्तांकडे येऊन तिने सांगितले की, "भन्ते, भोजनाचा समय झाला आहे आणि भोजन सिद्ध आहे."

मग भगवन्तांनी सकाळच्या समयी चीवर परिधान केले व भिक्षापात्र घेऊन भिक्षूंच्या समुदायासमवेत ते अम्बपालीच्या निवासस्थानी गेले. तेथे आल्यावर आपल्यासाठी सज्ज केलेल्या आसनावर ते बसले. आणि त्या गणिका अम्बपालीने भिक्षूंच्या पंगतीसमोर तो गोड भात व पक्वान्ने ठेवली. भगवान बुद्ध (अर्थात्) पंगतीत प्रथम स्थानी बसले होते. ते सर्व तृप्त होईपर्यंत अम्बपालीने (स्वतः) त्यांना वाढले.

भगवन्तांचे भोजन संपल्यानंतर त्या गणिकेने एक कमी उंच असलेले आसन तेथे आणविले आणि भगवन्तांच्या शेजारी त्याच्यावर बसून ती त्यांना म्हणाली "भन्ते, हा प्रासाद, बुद्ध ज्याचे प्रमुख आहेत त्या भिक्षुसंघाला मी देत आहे." भगवन्तांनी त्या दानाचा स्वीकार केला. मग धर्मविषयक प्रवचन देऊन त्यांनी त्या गणिका अम्बपालीला उपदेश केला. तिला जागृत, उत्तेजित आणि उल्हसित करून ते आसनावरून उठले व तेथून निघाले.

अम्बपालीच्या आंबराईत रहात असताना भगवन्तांनी शील, समाधी आणि प्रज्ञा यांच्या स्वरूपाविषयी विस्तृत धर्मविषयक प्रवचन केले : *"शीलाने परिवर्धित झालेल्या समाधीपासून महान फळ मिळते, महान लाभ होतो, समाधीने परिवर्धित झालेल्या प्रज्ञेपासून महान फळ मिळते, महान लाभ होतो. प्रज्ञेने परिवर्धित झालेले चित्त कामासव, भवासव, अविद्यासव ह्या आसवांपासून मुक्त होते."*

३३) मग अम्बपालिवनात आपल्या इच्छेनुसार राहिल्या-नंतर भगवान आयुष्मान आनंदाला म्हणाले, "चल, आनंदा, आपण वेळुवं गावाला जाऊ या." "जशी आपली इच्छा, भन्ते," असे आयुष्मान आनंदाने भगवन्तांना उत्तर दिले. मग, भगवन्त, भिक्षूंच्या मोठ्या समुदायाबरोबर वेळुव येथे जायला निघाले आणि तेथे पोचल्यावर ते त्या गावातच राहिले.

मग तेथे भगवन्त भिक्षूंना उद्देशून म्हणाले, "भिक्षू हो, तुम्ही वेसालीच्या आसपास आपापले मित्र, नातलग किंवा सहचारी यांच्याबरोबर वर्षाकाळ घालवा. मी येथेच वेळुव गावात वर्षाकाळ घालवीन." "भन्ते, जशी आपली इच्छा," असे म्हणून ते भिक्षू आपापले मित्र, नातलग, सहचारी यांच्याकडे गेले. भगवन्त तेथेच वेळुव गावात पावसाळ्यासाठी राहिले.

३४) आता, भगवन्त वेळुव येथे वर्षाऋतून रहात असताना त्यांना एक प्रखर व्याधी जडली, त्यांना मरणप्राय वेदना होऊ लागल्या, पण अविचल आणि प्रज्ञानी भगवन्तांनी त्या शांतपणे सहन केल्या.

मग भगवन्तांच्या मनात असा विचार आला, 'माझ्या शिष्यांना उद्देशून बोलल्याशिवाय, संघाचा निरोप घेतल्याशिवाय मी परिनिर्वाणात विलीन होणे योग्य ठरणार नाही. तेव्हा मोठा प्रयत्न करून मला ही व्याधी दडपून टाकली पाहिजे आणि माझी ठरलेली वेळ येईपर्यंत मला जीवनावरची माझी पकड स्थिर ठेवली पाहिजे.' मग भगवन्तांनी मोठा प्रयत्न करून ती व्याधी दडपून टाकली आणि त्यांनी ठरविलेली वेळ येईपर्यंत जीवनावरची आपली पकड स्थिर राखली. आणि त्यांची व्याधी शमली.

आता, भगवन्त आजारातून बरे होत असताना, त्यांचा आजार अजून पुरता निवळला नसताना, एकदा ते विहारातून बाहेर गेले आणि जवळच मांडलेल्या एका आसनावर बसले. आणि आयुष्मान आनंद भगवन्त बसले होते तेथे गेला आणि त्यांना अभिवादन करून आदराने त्यांच्याजवळ बसला आणि त्यांना उद्देशून म्हणाला, "भन्ते, भगवंत आरोग्यात असताना

कसे होते ते मी पाहिले आहे आणि भगवन्तांना (व्याधीपासून होणाऱ्या) व्यथा सहन करताना मी पाहिले आहे. भगवन्तांना व्याधिग्रस्त अवस्थेत पाहताना माझी काया वेलीसारखी दुबळी झाली, माझ्या दृष्टीला दिशा अंधुक झाल्या आणि माझ्या मन:शक्ती गढूळ झाल्यासारख्या झाल्या. हें सर्व झाले तरी माझे ह्या विचाराने काहीसे सांत्वन झाले की, भिक्षुसंघाला (आपण गेल्यानंतर संघाने कसे वागावे ह्याविषयीचा) उपदेश केल्याशिवाय भगवन्त निर्वाणाप्रत जाणार नाहीत."

*"तर मग, आनंदा, भिक्षुसंघाची माझ्याकडून काय अपेक्षा आहे? बाह्य (सर्वसामान्य प्राकृत जनांसाठी असलेले) सत्य आणि गुह्य (केवळ थोड्या अधिकारी माणसांसाठी असलेले) सत्य, असा भेद न करता मी सत्याचा उपदेश केला आहे. आनंदा, धर्माविषयी उपदेश करताना तथागताची मूठ झाकलेली नसते. (लोकांच्या दृष्टी पडणार नाहीत अशी काही सत्ये आवळलेल्या मुठीत झाकून ठेवलेली नसतात.) पहा, आनंदा, जर एखाद्याला असे वाटले की, 'संघाचे नेतृत्व करणारा कुणी असेल तर तो मी आहे,' 'संघ माझ्यावर अवलंबून आहे' तर त्याने काय ते संघाशी संबंधित असलेल्या गोष्टींविषयी आदेश द्यावेत. आता, आनंदा, तथागताला असे वाटत नाही की आपणच काय ते संघाचे नेतृत्व करू किंवा संघ आपल्यावर अवलंबून आहे. मग संघाशी संबंधित असलेल्या कोणत्याही गोष्टीविषयी त्याने आदेश का द्यावेत? आनंदा, मीही आता वृद्ध झालो आहे. माझे वय झाले आहे. माझा प्रवास आटोपत आला आहे. माझ्या आयुष्याची अखेर आली आहे. माझे वय आता ऐंशी आहे. जशी एखादी खिळखिळी झालेली गाडी तिची खूप काळजी घेतली तरच चालत ठेवता येते त्याप्रमाणे मला वाटते की तथागताचे हे शरीर त्याची खूप काळजी घेऊनच चालत ठेवता येईल. आनंदा, जेव्हा तथागत एखाद्या बाह्य वस्तूकडे लक्ष देण्याचे किंवा एखाद्या संवेदनाचा अनुभव घेण्याचे सोडून देतो आणि मानसिक समाधीत निमज्जन करतो तेव्हाच त्याचे शरीर स्वस्थ असते.*

*"तेव्हा, आनंदा, तुम्ही आत्मदीप व्हा. तुमचे शरणस्थान म्हणजे तुम्ही स्वत:च असावे. अन्य कोणतेही शरणस्थान तुम्ही स्वीकारू नये. धर्म हाच तुमचा दीप असावा. धर्म हेच तुमचे शरणस्थान असावे. अन्य कोणतेही शरणस्थान तुम्ही स्वीकारू नये. आनंदा, भिक्षू कशा रीतीने आत्मदीप होईल, आत्मशरण होईल, अन्यशरण होणार नाही, धर्मदीप होईल, धर्मशरण होईल, अन्यशरण होणार नाही?*

*"आनंदा, जोपर्यंत भिक्षू शरीरामध्ये निवास करीत असतो, तोपर्यंत प्रयत्नपूर्वक, विचारपूर्वक सावधपणे निवास करीत, जगात वावरताना, शारीरिक वासनांपासून जे दु:ख निर्माण होते त्यावर त्याने पगडा मिळवावा; त्याला संवेदना प्राप्त असताना, प्रयत्नशील, विचारशील, सावधान अशा अवस्थेत जगात वावरत असताना, संवेदनांपासून जे दु:ख लाभते त्यावर त्याने पगडा मिळवावा आणि जेव्हा भिक्षू विचार करीत असतो किंवा युक्तिवाद करीत असतो किंवा त्याच्या मनात काही भावना जागृत होतात तेव्हा ह्या विचारामुळे, तर्कामुळे, भावनांमुळे ज्या तृष्णा त्याच्या मनात निर्माण होतात त्यांच्यापासून होणाऱ्या दु:खावर त्याने पगडा मिळवावा.*

*"आणि, आनंदा, आता, किंवा मी गेल्यानंतर, जे भिक्षू आत्मदीप असतील, आत्मशरण असतील आणि अन्यशरण असणार नाहीत, धर्मदीप असतील, धर्मशरण असतील, अन्यशरण असणार नाहीत तेच भिक्षू श्रेष्ठतम असतील – मात्र त्यांना शिकण्याची उत्कट इच्छा असली पाहिजे."*

---

**टीपा :**

१) **अजातशत्रू वैदेहीपुत्र** – 'अजातशत्रू' हे विशेषनाम नाही. तो अधिकृत किताब आहे आणि त्याचा अर्थ '(ज्याची बरोबरी करणारा किंवा ज्याच्याहून वरचढ ठरेल असा) शत्रू उदयाला आलेला नाही असा' असा आहे. 'वैदेहीपुत्र' हे त्याच्या आईच्या नावावरून त्याला लाभलेले नाव आहे आणि आणि 'वैदेही' हे त्याच्या आईचे व्यक्तिगत नाम नसून कुल-नाम आहे. भारतीय बौद्ध ग्रंथांत राजे किंवा इतर श्रेष्ठ पुरुष ह्यांचा त्यांच्या नावांनी सामान्यपणे निर्देश करण्यात येत नाही. ह्यासाठी विशेषणांचा उपयोग करण्यात येतो. उदा. उपतिस्स ह्या बुद्धाच्या निष्ठावान, चिंतनशील शिष्याचा 'धम्म-सेनापति' किंवा 'सारिपुत्त' ह्या विशेषणांनी निर्देश करण्यात येतो. 'अजातशत्रू' आणि 'वैदेहीपुत्र' ह्या सारखीच ह्या विशेषणांची घडण झाली आहे हे ध्यानात येईल. (श्रीमती ऱ्हिस डेव्हिड्स यांच्या टीपेचा सारांश.)

२) गौतम बुद्धाच्या वेळच्या राजकीय परिस्थितीचे वर्णन प.ल. वैद्य यांनी असे केले आहे. "इसवी सनापूर्वीच्या सातव्या






व सहाव्या शतकांत हिंदुस्थानाच्या विंध्योत्तर प्रदेशात सार्वभौम असा एकही राजा नव्हता. उत्तर हिंदुस्थानचे पुष्कळच लहानमोठे विभाग झाले होते व त्यांवर निरनिराळ्या वंशांतील पुरुष राज्य करीत असत... बौद्ध ग्रंथांमध्ये असे देश सोळा आहेत असे वर्णन येते. या सोळा... देशांपैकी त्या काळी चारच राज्ये प्रमुख होती. मगध... कोसल किंवा उत्तरकोसल... वत्स... अवंती. .... (या) चार मोठ्या राष्ट्रांखेरीज उत्तर हिंदुस्थानात पुष्कळ लहान लहान राज्ये अस्तित्वात होती. या राज्यांचे अधिपतित्व एखाद्या विशिष्ट घराण्याकडे असे आणि त्या घराण्याच्या नावावरून राज्याला नाव मिळे... बौद्ध वाङ्मयामध्ये वज्जी नावाच्या एकाच घराण्याची विदेह आणि लिच्छवी अशी दोन घराणी झाली... कोलिय घराणे शाक्य घराण्याचीच एक शाखा, असे उल्लेख आहेत." (*बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार*, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई, १९९५, पृ. ३३-३५)

३) मूळात 'इद्धि' हा शब्द येतो आणि हा शब्द अनेकदा 'तपश्चर्येने, ध्यानधारणाने प्राप्त झालेली अलौकिक शक्ती' ह्या अर्थाने वापरण्यात येतो. पण येथे त्या स्वरुपाची शक्ती अभिप्रेत नाही. वज्जींमध्ये एकोपा होता ही त्यांची 'इद्धि' होती आणि ते सतत लष्करी सराव करीत ह्याच्यात त्यांची पराक्रमी वृत्ती (मूळात 'महानुभाव') सामावलेली होती असा अर्थ भाष्यकारांनी लावला आहे. (श्रीमती ऱ्हिस डेव्हिड्स यांची टीप.)

४) हे अर्थात बुद्धपूर्व चैत्य होते. हे यक्ष-चैत्य होते असे भाष्यात स्पष्ट केले आहे. (श्रीमती ऱ्हिस डेव्हिड्स यांची टीप.)

५) हे मंदिर म्हणजे पूर्वी जेथे सारन्दद या यक्षाचे मंदिर होते त्या जागी बांधलेला विहार होता, अशी भाष्यकारांनी टिप्पणी दिली आहे. (श्रीमती ऱ्हिस डेव्हिड्स)

६) उपट्ठान-शाला म्हणजे भिक्षू जमण्याचे स्थळ

७) प्रस्तुत विवेचनाच्या संदर्भात सुरेन्द्रनाथ दासगुप्ता यांनी केलेले पुढील विवरण उपयुक्त ठरेलः " .... क्लेश (किलेस) हे आसवांपासून फारसे भिन्न नाहीत. आपल्याला परिचित असलेले असे ते मनोविकार आहेतः लोभ, द्वेष, मोह, औद्धत्य, मान, पाखंड (दिट्ठी), संशय (विचिकिच्छा), निर्लज्जपणा (अहिरिक), कोडगेपणा (अनोत्तप) हे क्लेश आसवांपासून सरळ निष्पन्न होतात. त्यांच्यात एवढी विविधता असली तरी अनेकदा त्यांचा तीन विकारांत – लोभ, द्वेष आणि मोह – अंतर्भाव करण्यात येतो आणि ह्या तिघांना क्लेश म्हणण्यात येते...

"शील म्हणजे थोडक्यात सर्व पापी कृत्ये करण्यापासून निवृत्ती. तेव्हा (साधनेचा) प्रारंभ शीलापासून केला पाहिजे कारण शीलामुळे जी कर्मे करायला वाईट इच्छा आपल्याला प्रवृत्त करतात ती करण्याचे आपण सोडून देतो....ह्यामुळे क्लेशांचे निर्मूलन होते आणि म्हणून शीलाचे जर आपण योग्यपणे आचरण केले तर अर्हत् पदाला नेणाऱ्या पहिल्या दोन पायऱ्यांवर आपण क्रमाने आरूढ होतो. ह्या दोन पायऱ्या म्हणजे 'सोतापन्नभाव' (स्रोतापन्नभाव = योग्य प्रवाहात उतरणे) आणि 'सकदागामिभाव' (निर्वाण साधण्यासाठी आणखी एकच जन्म घ्यावा लागेल अशी स्थिती)... समाधी ही अधिक प्रगत अवस्था आहे..." (*ए हिस्टरी ऑफ इन्डियन फिलॉसॉफी*, खंड १, दिल्ली १९७५, पृ. १००.)








अनुक्रमणिका





# गुरुपंचक

**वेणू पळशीकर**

कॉंटिनेंटल या सुप्रसिद्ध प्रकाशन संस्थेचे संस्थापक कै. अनंतराव कुलकर्णी यांचे हे छोटेखानी पुस्तक अगदी अलीकडेच प्रसिद्ध झाले आहे. आजन्म विद्यार्थिव्रत धारण केलेल्या अनंतरावांनी वयाच्या सहाव्या वर्षी त्यांना गायत्री मंत्राची दीक्षा देणाऱ्या रावजी भटांपासून वयाच्या सहासष्टाव्या वर्षी त्यांना भेटलेल्या गुरुवर्य बाबा (प्रो. के.व्ही. बेलसरे) यांच्या पर्यंतच्या आपल्या निवडक गुरुपंचकाच्या संदर्भातील आठवणी या छोट्याशा पुस्तकात ग्रथित केल्या आहेत. यातील तीन गुरुजी, मराठी तिसरीत (दळवी मास्तर), इंग्रजी चौथीत (नी.य. कुलकर्णी सर) आणि मॅट्रिकच्या वर्गात (ती. नाना) त्यांचे शिक्षक म्हणून त्यांच्या जीवनात प्रविष्ट झाले. या तिघांशीही असलेला त्यांचा गुरुशिष्य संबंध आजन्म टिकून राहिला व वृद्धिंगतही झाला. उरलेले दोन म्हणजे रावजी भट आणि गुरुवर्य बाबा हे आध्यात्मिक क्षेत्रातील गुरु म्हणता येतील.

पुस्तकांच्या मलपृष्ठावर पुस्तककर्त्याचे नाव विद्यार्थी अनंत अंबादास कुलकर्णी असे छापलेले आहे. वयाची पंचाहत्तरी ओलांडलेले अनंतराव स्वतःला लेखक म्हणून संबोधण्याऐवजी विद्यार्थी म्हणवून घेण्यात धन्यता मानतात हे किती सार्थ आहे याची प्रचिती पुस्तकात पानोपानी मिळते.

अनंताचा जन्म १९१७ सालचा. अनंतचतुर्दशीचा. त्याच्या जन्मानंतर केवळ दहा दिवसांच्या आत त्याच्या आईला वैधव्य प्राप्त झाले. त्यावेळी ती फक्त १८-१९ वर्षांची होती. शोकावेगाने सैरभैर झालेल्या अनंताच्या आईने आपल्या नवजात बालकाचाही अव्हेर करून सुरुवातीचे दोन-तीन महिने शोकमग्नतेने कपाळ फोडून घेण्यात, अन्न-पाणी वर्ज्य करण्यात व्यतीत केले. अनंताच्या आईचे सख्खे मामा शुचिर्भूत व्रतस्थ रावजी भट. त्या वर्षी दिवाळीला भाऊबिजेसाठी आल्याआल्याच त्यांना बहिणीकडून सर्व वर्तमान कळते. त्यांचा जीव कळवळतो. ते भाचीच्या खोलीत जातात. 'जनाबाई, अग जनाबाई' अशा हाका मारतात. जनाबाई गुढग्यात डोके घालून ढसाढसा रडत होती. मामा पुढे झाले आणि भाचीच्या पाठीवर हात फिरवीत राहिले. मामांनी बराचसा हितोपदेश करून जनाबाईची समजूत घातली. "बाळ, असा आकांत करून स्वतःच्या जिवाचे बरेवाईट करून घेऊ नकोस. त्या अनाथ लेकराला सांभाळण्यासाठी तुला जगलेच पाहिजे. त्याला लहानाचा मोठा कर. त्याला विद्याभ्यास शिकू देत. ऊठ बाळ. लेकरू आण आणि देवघरासमोर बसून त्याला पदराखाली घे." आपल्या भाचीने आपल्या शब्दांचा मान राखला म्हणजे एकप्रकारे आपल्याला उपकृत केले, ऋणी केले या भावनेने या दशग्रंथी निरिच्छ भटजींनी - रावजी भटांनी – आवर्जून अनंताच्या मौंजीबंधनप्रसंगी आपली उपस्थिती लावली. त्यावेळी अनंताला नुकतेच सहावे संपून सातवे वर्ष लागलेले होते. घरच्या माणसांनी त्याच्या एका वडील चुलत भावाच्या मुंजीबरोबरच त्याचीही मुंजीत मुंज उरकून टाकण्याचे ठरवले. चुलत भावाची मुंज लावणारे भटजी आणि अनंताची मुंज लावणारे रावजी भट या दोहोंमधील फरक फार बोलका आहे. रावजी भटांनी भिक्षावळीत मिळालेले फराळाचे सर्व पदार्थ जमलेल्या बाळगोपाळांना ताबडतोब वाटून टाकले आणि त्यांना मिळालेली जी काही चार-दोन रुपये दक्षिणा होती तीही साऱ्या ग्रामस्थ भटाभिक्षुकांना यथापात्रता वाटून टाकली. चुलत भावाची मुंज लावलेल्या भटजींनी फराळाच्या पदार्थांनी भरलेली झोळी स्वतःजवळ ठेवून घेतली. कुणालाच काही घेऊ दिले नाही. जाताना मामा (रावजी भट) म्हणतात, "बाळ जनाबाई, तुझी आठवण ठेवून मुद्दाम तुझ्या अनंताची मुंज लावावयास आलो. तुझे मी लागत असलेले देणे यानिमित्ताने मी थोडेफार फेडलेले आहे. बाई ग, माझं त्या वेळी ऐकलंस, जिवाचं बरं-वाईट करून न घेता जगलीस, लेकराला वाढविलंस, माझ्या शब्दाला मान दिलास; एका अर्थी माझ्या डोक्यावर उपकारच करून ठेवले आहेस. कष्ट, हाल-अपेष्टा सोशीत सहा-सात वर्षे नेकीने वागत आलीस, त्यामुळे मीही तुझी

---

* **तस्मै श्री गुरवे नमः** – अनंत अंबादास कुलकर्णी; त्रिदल प्रकाशन, मुंबई १९९४; किं. रु. ३०/-.








अनुक्रमणिका

काही जबाबदारी पत्करलेली आहे. ती अजून काही पूर्ण झालेली नाही." यानंतर जवळजवळ दीड तपांनी रावजी भट अनंताच्या आईला भेटायला अनंताच्या घरी येतात. 'तट्टू' या जुन्या आडनावाने त्याला संबोधतात. दम्याच्या विकाराने रात्रभर हैराण झालेले असूनसुद्धा सकाळी नऊ वाजता केवळ दर्भस्नान करून घराच्या मधल्या खोलीत एक धार्मिक विधी पार पाडतात. छोटासा यज्ञ करून ताम्हनातले तीर्थ सर्वत्र घरभर शिंपडतात आणि परत जाताना म्हणतात, "जनाबाई, आज मी तुझ्या ऋणातून खऱ्या अर्थाने मुक्त झालो आहे. माझेही दिवस आता फार उरलेले नाहीत. तुमच्या कल्याणार्थ मी परमेश्वराजवळ नित्य प्रार्थना करीत राहीन, येतो मी." अशा या रावजी भटांचे वर्णन करताना अनंतराव लिहितात, "यजमानाकडून अमुक इतकी दक्षिणा मिळालीच पाहिजे असा कुठलाही दंडक, आग्रह त्यांचा नसे; आणि अशी जी यथाशक्ती दक्षिणा मिळालेली असे ती ते तेथल्या तेथेच ग्रामस्थ भटा-भिक्षुकांना वाटून टाकत. त्यामुळे साहजिकच या शुचिर्भूत व्रतस्थ ब्राह्मणाचा सर्वत्र दबदबा होता. गुरुमंत्र घेण्यासाठी अनेक त्यांच्याकडे येत. ते अशा गुरुमंत्र मागणाऱ्यांना 'द' चे आचरण करावयास सांगत. मनोविकारांचे दमन कर, प्राणिमात्र, पशु-पक्षी यांच्यावर दया कर आणि सपात्री गरिबांना दान देत जा.... असे सांगत असत. त्यांच्या दृष्टीने माणसांच्या जाती फक्त दोनच होत्या : भली माणसे, बुरी माणसे. कळंब या गावी तर एक मुसलमान तांबोळीसुद्धा त्यांचा यजमान होता. त्याच्या घरी वर्षातून एकदा रावजी भट जात आणि खंडोबाच्या टाकाची पूजा करीत." अशा गुरुतुल्य मामेआजोबांबद्दल कृतज्ञता व्यक्त करताना अनंतराव सांगतात : "रावजी गुरुजी मला क्षणोक्षणी आठवतात. त्यांचा 'द' मी शक्यतो विसरत नाही."

१९२५ साली वयाच्या आठव्या वर्षी मौजे कळंब, ता. जुन्नर येथील मराठी शाळेत तिसऱ्या इयत्तेत दळवी मास्तरांच्या हाताखाली अनंता शिकत असतो. वर्गात मुले असतील तीस-पस्तीस. ब्राह्मणांची फक्त तीन. बाकी इतर माळ्या-मराठ्यांची, दोन तेल्यांची, एक सुताराचा आणि एक महाराचा. अनंत ब्राह्मणाचा. त्यातल्या त्यात हेडमास्तरांचा पुतण्या म्हणून दळवी मास्तरांनी त्याची कधीही गय केली नाही. दर शनिवारी अनंताला शाळेत जायला उशीर आणि अवतार तर औरच. अर्ध्या चड्डीचे एक पाखे वर तर एक खाली. गुंड्या नको तेथे सुटलेल्या, सदरा चुरगळलेला, बटणे खालीवर लावलेली. शेंडी टोपीच्या बाहेर आलेली. घाईघाईने तोंड विसळलेले. एकदा शाळा सुटल्यावर अनंताला थांबायला सांगून दळवी मास्तर म्हणाले, "काय अंतोबा, तुम्ही शहाणे कधी होणार? अरे बाळ, तुला नाहीत वडील. तुझी आई बिचारी सोवळे घेतलेली. दिवसरात्र ती राबराब राबते. सदा कामाला जुंपलेली. कष्टापाई अवेळीच थकलेली. तुला तिचीसुद्धा काही दया येत नाही ना? बापावेगळे पोर म्हणून चुलते तुला शिक्षा करत नसावेत. अभ्यास बरा म्हणून तुला शिस्तीत वागवीत नसावेत. पण तुझे हे वर्तन चांगले नाही. तुझ्याबद्दल मला राग तर येतोच, पण वाईटही वाटते." यानंतर लवकरच अनंता सकाळ-संध्याकाळ आईबरोबर नदीवर जाऊ लागतो. तिने घासलेली भांडी आणि धुतलेले धुण्याचे पिळे खांद्यावर घेऊन घरी आणू लागतो. दळवी मास्तरांची करडी नजर आपल्यावर नसती तर आपले वर्तन नीट मार्गी लागले नसते; आईचे कष्ट व दुःख आपल्याला नीट कळले नसते, असे त्याला वाटते. या अनाथ विद्यार्थ्याने दळवी मास्तरांच्या पत्नींबद्दल – मुक्ताकाकूंबद्दल – जो आदरभाव प्रकट केला आहे तो मुळातूनच वाचायला हवा : "मुक्ताकाकूंना पोटचे पोर नसावे म्हणून असावे. त्यांनी एक दारचे पोर माझ्या रूपाने आपले लेकरू मानले असावे. त्या माऊलीने खरोखरच माझ्यावर खूप माया केली. अगदी निरपेक्ष माया होती ती. मास्तरांसारखा उपदेश काकूंनी मला कधीच केला नाही. माझ्या आईच्या स्वभावाच्या तुलनेत तर मला काकू अधिक मायाळू वाटत. त्या दिवसांत ही तुलना क्षम्य असावी."

दोन तपांनंतरसुद्धा अशा या गुरुजींना आणि मुक्ताकाकूंना भेटण्याच्या आंतरिक ओढीने अनंता तेथे जातो. काकू तर दिवंगत झालेल्या असतात. त्यांचा फोटोच त्यांनी कधी काढू दिलेला नसतो. त्यामुळे या विद्यार्थ्याला तोही मिळत नाही. दळवी गुरुजींना *नवनीत* हा पुनःपुन्हा वाचावा असा कवितासंग्रह विकत हवा असतो. (आपल्या निवृत्तिवेतनातून आपण तसे करण्यास समर्थ आहोत अशी सार्थ साक्षेपी वृत्ती त्यांची असते). पुढल्या खेपेस अनंता हा दुर्मिळ कवितासंग्रह प्राप्त करून गुरुजींना भेट म्हणून देण्यास सपत्नीक जातो. पण तोपर्यंत त्याचे गुरुजीही मुक्ताकाकूंच्या भेटीला गेलेले असतात.

या पुस्तकात पुढे भेटतात ते नी.य. कुलकर्णी सर, जुन्नरच्या पी.ई. हायस्कूलमधील शिक्षक. अनंताचे इंग्रजी चौथीतील वर्गशिक्षक. ते मूळचे खानदेशातल्या अमळनेरचे. सानेगुरुजींच्या परिवारातले. हृदयपरिवर्तनाच्या गांधीप्रणीत मार्गावर विश्वास ठेवणारे. खादीधारी, सौजन्यशील, हसतमुख. शिकवत अगदी मन लावून. त्यांचा तास संपूच नये असे वाटे. अक्षर उत्तम. विद्यार्थ्यांना प्रिय. गरीब विद्यार्थ्यांसाठीच्या ब्राह्मणबोर्डिंगमध्ये वास्तव्य करणाऱ्या अनंताला एका श्रावणी शनिवारी एन.वाय. सर मुंजा म्हणून घरी जेवायला बोलावतात. त्याची सारी माहिती विचारून घेतात. अनंता नारायणगावचा. वडील वारलेले. आईचा ससेमिरा आणि चुलत्यांची मदत म्हणूनच केवळ इंग्रजी शिकावयास आलेला. तसा हुशार आणि वर्गात उठून दिसणारा. त्यामुळे तो साहजिकच सानेगुरुजींच्या संस्कारात वाढलेल्या नी.य. सरांचा सर्वांत आवडता विद्यार्थी बनतो. अनंता सांगतो, "माझ्या हूडपणामुळे त्यांनी प्रसंगी मला शिक्षाही केली असली तरी ती प्रेमळ पित्याच्या अंतःकरणाने केलेली होती." एकदा हूड व हुशार अनंताचा व त्याच्यासारख्याच इतर चार-पाच विद्यार्थ्यांचा गृहपाठ करण्यातील चुकारपणा, शिक्षेच्या बाबतीतील कोडगेपणा यांनी त्रस्त होऊन सरांनी वर्गात विद्यार्थ्यांच्या ऐवजी स्वतःच्याच हातावर हात लालबुंद होईपर्यंत छड्या मारून घेतल्या. अनंता त्यामुळे रडवेला होतो. बोर्डिंगात गेल्यावर प्रायश्चित्त म्हणून तो, आपला हातही तसाच लालबुंद होईपर्यंत स्वतःच स्वतःला छड्या मारून घेतो व सरांच्या घरी जाऊन त्यांची माफी मागतो. पुढे १९६० साली पानशेत पुरामध्ये सर्वात जास्त वाताहत अनंतरावांच्या कॉंटिनेंटल प्रकाशनाची होऊनही सरकारकडून किंवा अन्य कोणाकडून आलेली मदत न स्वीकारता स्वतःच्या जिद्दीवर हे संकट पार करण्याचा निश्चय अनंतराव करतात. जिवावर बेतले तरी जिद्दीने पाय रोवून उभे राहण्याचे बाळकडू अनंतरावांना त्यांच्या वडिलांकडून मिळाले असणार. जन्मतःच पितृछत्राला पारखे झालेले अनंतराव आपल्या वडिलांबद्दल लिहितात : "माझे वडील वाडे या गावी हेडमास्तर होते. त्या काळात प्राथमिक शाळेच्या हेडमास्तरकडेच त्या गावचे पोस्टऑफिस सांभाळण्याचे काम असे. पोस्ट ऑफिसची सरकारी जबाबदारी, १९१७ च्या प्लेगच्या काळात सारे वाडे गाव प्लेगच्या भयामुळे ओस पडले तरी, ते निष्ठेने सांभाळीत राहिले व वरून काही हुकूम येईल आणि मगच आपण गाव सोडू असे त्यांनी ठरवले." दुर्दैवाने वरून हुकूम येण्यापूर्वीच ते प्लेगला बळी पडले. तर, पूरप्रसंगी इतरांची मदत नाकारणाऱ्या जिद्दी अनंतरावांना एक अपवाद करणे भाग पडते. तो म्हणजे नी.य. कुलकर्णी सरांनी मदत म्हणून ट्रकमधून पाठवलेल्या दोन बाचकी गव्हाचा. तो दीडमण सहजच होता. अनंता पुढे सांगतो, "आज अप्पा (नी.य. कुलकर्णी सर) प्रत्यक्षात नाहीत. पण त्यांच्या घरात घडणाऱ्या लहान-मोठ्या सुखदुःखाच्या प्रसंगी मला आवर्जून निमंत्रण येते आणि मीही जातो. गेलो नाही तर अप्पांना काय वाटेल ह्या भयादर माझ्या मनात येतो आणि त्या त्या प्रसंगी हजर राहतोच."

अनंता जुन्नरला प्रि. सबनीसांनी सुरू केलेल्या न्यू स्कूलमधून मॅट्रिक झाला. स्वतः प्रि. सबनीस मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांसाठी इंग्लिशचे जादा तास घेत. जुन्नरच्या बोर्डिंगमध्ये राहून शाळा शिकणाऱ्या व शनिवारी शाळा सुटल्यावर भाड्याच्या सायकलवरून नारायणगावी जाणाऱ्या अनंताचा लेंगा एका सोमवारी तो या जादा तासासाठी परत येताना सायकलच्या चेनमध्ये अडकून फाटतो व त्याला तासाला यायला उशीर होतो. नियमाप्रमाणे त्याला दोन आणे दंड होतो. दंड भरण्यासाठी त्याच्याजवळ पैसे नसतात. वेळेवर दंड न भरल्यामुळे आठवड्यानंतर दंडाची रक्कम दुप्पट होते व सबनीस सर अनंताला ऑफिसमध्ये बोलावून घेतात. अनंताच्या काकांना दरमहा फक्त पन्नास रूपये पेन्शन मिळत असते. त्यामधून ते दरमहा फक्त दहा रुपये अनंताला देऊ शकतात. शाळेची मासिक फी चार रुपये, बोर्डिंगचा मासिक खर्च पाच रुपये वजा जाता इतर खर्चासाठी फक्त एक रुपया उरत असतो. आणि तोही दर शनिवारी सायकलवरून गावी जाण्यासाठी सायकलच्या भाड्यापोटी खर्च होत असतो. सर्व परिस्थिती ध्यानात येताच सबनीस सर स्वतःच्या खिशातून दंडाचे चार आणे भरतात आणि दंड भरल्याची पावती अनंताला ऑफिसमधून मिळते. अनंता सांगतो, "आणि त्या क्षणापासून प्रि. सबनीस माझे केवळ सर, हेडसर राहिले नसून आणखीही कोणीतरी झाले आणि मी त्यांना नाना म्हणू लागलो."

एकदा नव्या वाटेने शिवनेरीवर जाण्याचे साहस करीत असताना मध्येच ती. नानासाहेबांना दम्याची धाप लागते. रात्रभर एका झाडाखाली थंडीमध्येच पोक काढून ओणवे बसून राहावे लागते. धाप थांबल्यावर दुसऱ्या दिवशी सकाळी परतताना एके ठिकाणी ते घसरतात. उजव्या हाताचे मधले

बोट खरचटून रक्ताळते. चेहरा थकलेला होता. आवाज बसलेला होता. अंगात कसकसही होती. पण एवढे सर्व होऊनही बरोबर सातला पाच मिनिटे कमी असतानाच ते इंग्रजीच्या जादा तासाला हज़र राहिले. अनंता सांगतो, "तास बुडवून विद्यार्थ्यांचे नुकसान होऊ नये म्हणून त्यांची ही धडपड होती. आम्हांला ती जाणवत होती. त्या दिवशी, मी दंड न भरल्यामुळे ती. नानांनी तो का भरला याचा संपूर्ण अर्थ मला नीट उलगडला आणि तासाला उशीर न करणं किती महत्त्वाचं असतं याची तीव्रतेने जाणीव झाली." असे हे नानासाहेब विद्यार्थ्यांबरोबर ग्राउंडवर क्रिकेटही खेळत आणि विद्यार्थ्यांनी केलेल्या स्वतःच्या नकलेचे कौतुकही करीत आणि स्वतःची एखादी खास लकब अशा कलाकाराला समजूनही देत.

पुढे १९४४ मध्ये नानांनी नारायणगावला गावकऱ्यांच्या मदतीने ग्रामोन्नती मंडळ काढले आणि या मंडळातर्फे विद्यामंदिर ही बहुउद्देशीय शिक्षण-संस्था स्थापन केली. या बहुउद्देशीय शाळेसाठी विद्यार्थी वसतिगृह, शिक्षक निवास, अतिथिगृह, आरोग्यकेंद्र, समाजशिक्षण-केंद्र, शेती, कुक्कुटपालन, पशु-संशोधन, डेअरी वगैरे त्या काळी सुरू करणे केवढेतरी द्रष्टेपणाचे होते. गुरुवर्य रा.प. सबनीस यांच्या कारकीर्दीत म्हणजे १९४४ ते १९६० या सोळा वर्षांत अनेक मान्यवरांनी या संस्थेला सदिच्छा भेटी दिल्या. सानेगुरुजी, धोंडो केशव कर्वे, जे.पी. नाईक, चिंतामणराव देशमुख व त्यांच्या पत्नी दुर्गाबाई ही सर्व मंडळी सन्माननीय पाहुणे म्हणून नव्हे तर केवळ या कल्पक संस्थाचालकाला भेटावे म्हणून आपणहून नारायणगावी येऊन गेली.

नानांच्या अंतकाळी नानांच्या हातात हात देऊन, 'नाना, नारायणगावच्या शाळेकडे लक्ष देईन आणि अंशतः तुमचे गुरुऋण फेडीन' असा शब्द अनंताने त्यांना दिला आणि १९६० ते १९९२ पर्यंत नानांचे कार्य जेवढे पुढे चालू ठेवता आले तेवढे काया, वाचा, मने आणि धनेकरून चालू राहावे असा प्रयत्नही त्याने केला.

वयाच्या सहासष्टाव्या वर्षी या विद्यार्थ्याची गुरुवर्य बाबा ऊर्फ प्रा. के.वि. बेलसरे यांच्याशी प्रथम भेट होते, ती त्यांनी संपादित केलेल्या *दासबोधा*ची दुसरी आवृत्ती काढण्याच्या निमित्ताने. ती. बाबांना संपादनार्थ मानधन किती हवे याची चौकशी प्रकाशक या नात्याने अनंतराव करतात. आणि या आगळ्यावेगळ्या संपादकाकडून त्यांना उत्तर मिळते, "मला काहीही मानधन नको आहे. जो काही नफा होईल तो मुख्यतः सज्जनगड संस्थानाला मिळावा. पहिल्या आवृत्तीच्या वेळेलाही मी मानधन घेतलेले नाही." अनंतराव सांगतात, "प्रा. बेलसरे यांचे ते औदार्य मला या व्यवसायात नवीन होते." अनंतराव अवाक् झालेले पाहून प्रा. बेलसरे पुढे म्हणाले, "तुम्ही एक मात्र करा. छपाई बिनचूक होईल असे पाहा. मुद्रित-संशोधन कसोशीने व्हायला हवे. पहिल्या आवृत्तीत काही मुद्रणदोष राहून गेलेले आहेत." (*दासबोधा*च्या दुसऱ्या आवृत्तीला प्रा. बेलसरे यांनी जे संपादकीय लिहिले आहे त्यात ग्रंथ चांगला व शुद्ध छापल्याबद्दल अनंतरावांना नावानिशी धन्यता दिली आहे.)

अनंतरावांशी ओळख झाली तेंव्हा प्रा. बेलसरे यांचे वय पंचाहत्तरीच्या आसपास होते. पौर्वात्य तसेच पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा त्यांचा सखोल अभ्यास होता. नुसती पोपटपंची नसून तत्त्वज्ञान त्यांनी पचवले होते. *ज्ञानेश्वरी*, *गाथा*, *दासबोध*, *एकनाथी भागवत* वगैरे ग्रंथांचा सर्वांगीण अभ्यास करून त्यांचे महत्त्व सर्वसाधारण जनमानसापर्यंत पोचवण्यासाठी त्यांचे अखंड लेखन व प्रवचन चालू असे त्यांची प्रवचने ऐकायला पुणे, मुंबई, सातारा, सांगली वगैरे ठिकाणाहून शेकडो श्रोते हजर असत. ही सर्व मंडळी त्यांना बाबा या घरगुती नावाने संबोधत.

मालाड (प.) या रेल्वेस्थानकाच्या नजीकच्या बाबांच्या निवासस्थानी आता अनंतरावही कुठलाच संकोच न धरता जाऊ लागतात. अशाच एका भेटीत बाबा म्हणतात, "अनंतराव, आता प्रपंचातले लक्ष हळूहळू कमी करा. नारायणगावी अधिक राहात चला. विद्यामंदिराच्या कामात अधिक लक्ष द्या. पुण्याला मधूनमधून येत चला. तुमचा प्रकाशन व्यवसाय तुमची मुले आता समर्थतेने पाहात आहेत." ज्या तत्परतेने बाबा अनंतरावांना वानप्रस्थाश्रमाचे भान आणून देतात. त्याच तत्परतेने पुढे, पंचाहत्तरी उलटलेल्या अनंतरावांनी आता नारायणगावच्या शिक्षणसंस्थेतून हळूहळू निवृत्त व्हावे, असे सुचवतात. बाबा सांगतात, "आता अधिकारपदाचा राजीनामा द्या. लोकांचा आग्रह आहे तोपर्यंत नारायणगावी राहून केवळ विचारले तरच सल्ला देत चला. तुमचा सल्ला लोकांनी ऐकलाच पाहिजे असाही आग्रह धरू नका." बाबा अनंतरावांना आपला धाकटा भाऊ मानत आणि अनंतरावही आपल्या या गुरुतुल्य वडील

भावाच्या सर्व आज्ञा शिरोधार्य समजत. आपल्यावर झालेल्या या गुरुकृपेचे वर्णन करताना अनंतराव सांगतात, "तीर्थरूप बाबांच्या परिचयात आणि परिचयातून सहवासात आल्यापासून माझ्यात बराच बदल झालेला आहे. परवापरवापर्यंत तीव्र असलेले माझ्यातील षड्रिपू काहीसे मंदावलेले आहेत. माझे मन समाधानी झालेले आहे. बाबांचे आशीर्वाद आणि सदिच्छा आपल्या पाठीशी आहेत असे मनोमन वाटते आणि साहजिकच मनाला धीर येतो."

परिशिष्टामध्ये प्रकाशन व्यवसायाच्या निमित्ताने पुनर्भेट झालेल्या महाविद्यालयीन गुरुजींची नामावली व त्यांच्या संबंधीची काही हृद्य स्मरणे दिली आहेत. अण्णासाहेब सत्तेगिरी, पु.ग. सहस्रबुद्धे, श्री.म. माटे, डॉ. के.ना. वाटवे, ना.सी. फडके, सोनोपंत दांडेकर आदींचा त्यात समावेश आहे. प्रकाशन व्यवसायात आपल्याला जे यश मिळाले, मुख्य म्हणजे लांडीलबाडी न करता सौजन्याने वागून व्यवसाय करण्याची जी प्रेरणा मिळाली त्या संदर्भात, अनंतराव सांगतात, "सर्वश्री बोकील, सत्तेगिरी, माटे, सहस्रबुद्धे, डॉ. वाटवे या सर्वांनी मी त्यांचा विद्यार्थी आणि प्रकाशक या दोन्ही नात्यांनी माझ्यावर काही संस्कार केले असणार आणि न कळत धाकाने वागवून माझ्या व्यवहारात प्रामाणिकपणाही प्रस्थापित केला असणार. होय, असेच काहीतरी झाले असावे असे मला वाटत आलेले आहे. एरव्ही आमच्या व्यवसायात अप्रामाणिकपणा सहज करता येईल अशा काही जागा आहेत, पण मी त्या कधीच शोधल्या नाहीत." अशा प्रकारे आपल्या व्यावसायिक सचोटीचेही सर्व श्रेय आपल्या गुरुजनांना देऊन हा विनम्र विद्यार्थी मोकळा होतो.

या छोटेखानी पण सुरेख हृदयंगम पुस्तकाला गालबोट लावण्याचे काम प्रकाशक प्र.म. टिळक (त्रिदल प्रकाशन) आणि मुद्रक संजय ढोके (ग्राफिक ट्राफिक) यांनी छपाईमध्ये अनेक अक्षम्य (उदा. 'प्रथम ग्रासे मक्षिका पातः' या न्यायाने अगदी मुखपृष्ठावरील ठळक शीर्षकात गुरवेऐवजी गुरुवे असे अशुद्ध येते) चुका ठेवून केलेले आहे. त्यांचे अंशतः तरी निवारण करण्यासाठी पुस्तकाला शुद्धिपत्रक जोडणे इष्ट ठरले असते. मुद्रितसंशोधन कसोशीने करून मुद्रण निर्दोष करण्यासाठी ख्यातनाम असलेल्या अनंतरावांच्या या छोटेखानी पुस्तकात छपाईच्या चुकांची रेलचेल आढळावी हा केवढा मोठा दैवदुर्विलास! या सर्व अशुद्धांवर मात करूनही विद्यार्थी अनंताच्या शुद्ध भावामुळे त्याने लिहिलेल्या *तस्मै श्री गुरवे नमः* या 'गुरुचरित्रामृता'चे पारायण आधुनिक कालातील गुरु-शिष्यांना प्रेरणा देणारे त्यांची नैतिक उंची वाढवण्यास त्यांना स्फूर्ती देणारे ठरेल, असा विश्वास वाटतो.











अनुक्रमणिका

# अक्षरवेध

*नारीपर्व* – नीलम गोऱ्हे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९७; रु. १५०/-

*नारीपर्व* हा डॉ. नीलम गोऱ्हे यांच्या संकलित लेखांचा संग्रह आहे. साधारणतः १९८० ते १९९६-९७च्या दरम्यानचे हे लेख आहेत.

सामाजिक, राजकीय कामाच्या प्रेरणेतून त्यांनी युक्रांदमधून कामाला सुरुवात केली तेव्हा त्यांच्या लक्षात आलं की, स्त्री म्हणून वेगळेच प्रश्न सर्व थरांतील महिलांचे आहेत. त्यांच्या असंही लक्षात आलं की स्त्रियांच्या समस्यांमधे, त्यांना येणाऱ्या अडचणींत, त्यांच्या होणाऱ्या छळणुकीत जे विविध धार्मिक, सामाजिक, आर्थिक घटक गुंतलेले आहेत, त्या गुंत्याची सोडवणूक करण्याच्या निर्धाराने प्रयत्न केले तर स्त्री-मुक्तीचा जो लढा आहे तो अंतिमतः मानवमुक्तीकडे जाईल. तेव्हा स्त्री-मुक्तीच्या या लढ्यात पुढे जायचे असेल तर त्यासाठी नुसते विचार मांडून उपयोग नाही. ते कृतीत आणले पाहिजेत. आणि कृती करायची असेल तर त्यासाठी संघटना हवी. म्हणून मग क्रांतिकारी महिला संघटनेची स्थापना त्यांनी केली. क्रांतिकारी महिला संघटनेद्वारा काम करताना त्यांच्या लक्षात आले की, स्त्रियांच्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी त्यांना कुटुंबात, समाजात आत्मविश्वासपूर्वक जीवन जगता येण्यासाठी व्यापक माध्यमातून प्रयत्न झाले पाहिजेत. हे व्यापक माध्यम राजकारणाद्वारे, राजकीय पक्षांद्वारे मिळवावे लागेल. म्हणजेच राजकारणामधे क्रियाशील राहावे लागेल. त्यानुसार त्यांनी भारिपमधे प्रवेश केला, निवडणुकाही लढविल्या.

सुरुवातीची मांडणी पाहून *नारीपर्व*बद्दल मोठ्याच अपेक्षा निर्माण झाल्या. विचार-आचारांची सांगड घालण्यासाठी स्त्रियांचे संघटन, त्यासाठी व्यापक आधार, सत्ता मिळावी म्हणून राजकारण आदि. परंतु जसजसे हे विविध काळी लिहिलेले लेख वाचत जावे तसतसे जाणवू लागते की, या लेखांचे स्वरूप त्या त्या काळी मनात आलेले विचार – नुसते भराभर (विस्कळीतपणे) मांडलेले – असे आहे. त्यात एकसूत्रता नाही. मांडणी मोघम आणि संदिग्ध आहे. तर कधी काढले गेलेले निष्कर्षही वस्तुस्थितीला धरून नाहीत.

पान १४७ वर लेखिका लिहिते की, "सर्व घरचं सांभाळून करणारी नोकरदार महिलांची एक पिढी प्रचंड ओढगस्तीचे जीवन जगायला लागली. आपण सती गेलो नाही, केशवपन करावं लागलं नाही याच्याच समाधानावर व कृतकृत्यतेचा एवढा दबाव या पिढीवर होता की...." कृतकृत्यतेच्या या निष्कर्षाला काही आधार दिसत नाही. कारण स्त्रियांना शिक्षण मिळू लागले. त्यानंतर कनिष्ठ मध्यमवर्गाच्या ज्या कुटुंबांना आर्थिक विवंचनेने ग्रासले होते (कर्त्या पुरुषाचा तुटपुंजा पगार, मोठा परिवार, कुटुंबाला आर्थिक आधार नसणे इ.) त्याच कुटुंबांतील स्त्रियांना अर्थार्जनासाठी बाहेर पडता आले (याला अपवाद उच्चवर्णीय श्रीमंत अशा अगदी थोड्या स्त्रिया). त्यांची कमाई ही कुटुंबाला आवश्यक होती. या स्त्रिया जर सती जाणे, केशवपन करायला न लागणे यामुळे कृतकृत्य होत्या, तर रोजी-रोटीसाठी बाहेर पडावेच लागते अशा कष्टकरी समाजातील स्त्रिया – ज्यांना केशवपन लागू नव्हते, सती जावे लागत नव्हते, वेळप्रसंगी ज्या दुसरा घरोबा करीत, पाट लावून दुसरे लग्न करीत अशा स्त्रिया – घरात आणि घराबाहेर अमाप कष्ट करून, ओढगस्तीचे जीवन जगून वर नवऱ्याचा मारही खात होत्या. आजही स्थिती फारशी बदलली नाही. स्त्रिया अशा तऱ्हेने स्वतः कष्ट करून, सगळ्या घराची जबाबदारी पेलूनसुध्दा दबावाखाली जगतात त्यामागे केशवपनाचा किंवा सती जाण्याचा धाक असू शकत नाही. तो धाक असू शकतो पुरुषांच्या कुटुंबप्रमुखपदाला धक्का लागण्याचा; त्यातून निर्माण होऊ शकणाऱ्या कौटुंबिक कलहाचा आणि त्यातून स्त्री एकाकी पडण्याचा.

१५४ पानावर लेखिका म्हणते, "परिणामी १९७५ नंतर स्त्रियांच्या समूहाच्याही चिरफळ्या उडाल्या आहेत. यातील










एक छोटासा गट हा 'अमुक'वादी व स्त्रीवादी आहे. स्त्रीवादापेक्षा ही 'अमुक'वादाची बांधिलकी जास्त प्रभावी असल्याने...."

हा 'अमुक'वाद शब्द लेखिकेने कोणत्या अर्थाने वापरला आहे? तो राजकीय पक्षांना उद्देशून वापरला आहे का? उदा., साम्यवादी, बहुजनसमाजवादी, पुनरुज्जीवनवादी वगैरे? तसे असेल तर हे लक्षात घेतले पाहिजे की, कोणत्याही राजकीय पक्षाच्या ध्येयधोरणामधेच स्त्रियांसंबंधीचे धोरण निहित असते. जसे साम्यवादी पक्षामधे एकूणच शोषित आणि शोषक हा भेद मिटवणे अपेक्षित असते. सर्व समान आहेत हे गृहीत असते. त्यातच स्त्री-पुरुष समानतेचे सूत्र गोवलेले असते (कार्यवाहीत त्रुटी असतात), तर पुनरुज्जीवनवादी पक्षांमधे स्त्रीला बंदिस्त ठेवणेच अपेक्षित असते. स्त्रीवाद म्हणून वेगळी भूमिका अथवा 'अमुक'वाद म्हणून वेगळी बांधिलकी कोणत्याही राजकीय पक्षात नसते. त्यामुळे स्त्री-मुक्ती म्हणजे मानवमुक्ती असे ध्येय, असा विचार ज्यांचा असतो अशा स्त्री-पुरुषांनी कोणती राजकीय प्रणाली आपल्याला स्वीकारायची आहे, समतावादी का पुनरुज्जीवनवादी, याचा विचार स्वतःच करावयाचा असतो. सत्तास्थानावर पोचेपर्यंत कोणत्याही पक्षात जाणे आणि नंतर स्त्रीवादी (मानवमुक्तिवादी) धोरणाची अंमलबजावणी करणे अशक्य आहे. 'अमुक'वादी या शब्दाचा लेखिकेचा अर्थ काही निराळा असेल तर लेखनाच्या संदिग्धतेने तो लक्षात येत नाही.

'स्त्रियांचं राजकारणातील शोषण' हे एक प्रकरण आहे. त्यात राजकारणात भाग घेऊ इच्छिणाऱ्या, राजकीय वर्तुळात वावरणाऱ्या स्त्रियांना 'स्त्री' म्हणूनही काही समस्यांना तोंड द्यावे लागते, हे लेखिकेने नमूद केले आहे. हवे तेव्हा स्त्रियांचा वापर करणे, डोईजड वाटल्यास बाजूला करता येणे वगैरे. कधी स्त्रियाच स्त्रीत्वाचा (पुरुषांशी लाडिकपणे वागणे वगैरे) वापर करून शॉर्टकटने सत्ताप्राप्तीसाठी सत्तेवरील पुरुषांच्या निकट जाऊ पाहतात. पण बहुधा स्वतः टाकलेल्या मोहजालात स्वतःच फसण्याची त्यांना भीती असते वगैरे. आता, स्त्रियांना असे वापरणे, किंवा स्त्रियांची फसगत करणे हे राजकारणातच होते असे नाही. समाजरचनाच पुरुषप्रधान असल्याने कोणत्याही क्षेत्रात – मग ते औद्योगिक क्षेत्र असो, प्रशासकीय असो वा कला क्षेत्र – जेथे स्त्रिया संख्येने कमी आहेत, आणि निर्णय घेण्याचे अधिकार अथवा सत्ता पुरुषवर्गाकडे आहे, मोक्याच्या जागेवरही पुरुषवर्ग आहे, अशा सर्व ठिकाणी स्त्रियांना सावध राहावे लागते. तिचे दरवेळी लैंगिक शोषण होईल असे मुळीच नाही. किंबहुना अधिकारावर असलेले पुरुष असभ्यच असतात असे तर नाहीच नाही. पण स्त्री दुय्यम आहे ही भावना मात्र त्यांच्या मनातून गेलेली नसते. म्हणून प्रत्येक क्षेत्रात स्त्रियांचा सहभाग वाढेल, निर्णयप्रक्रियेत स्त्रियांना स्थान मिळेल त्यावेळी क्रमाक्रमाने स्त्रियांना दुय्यम मानण्याची प्रवृत्ती कमी होईल तेव्हा आपोआपच स्त्रीचे शोषण 'स्त्री' आहे म्हणून होणार नाही.

राज्यस्तरावरील स्त्रियांपेक्षा ग्रामीण भागातील स्त्रियांना पुरुषी अहंकाराचा अधिक त्रास होतो हे नमूद करताना लेखिकेने आंबेगाव तालुक्यातील धोंडमाळ गावाचे उदाहरण दिले आहे (पान १३२-३७). तेथील वत्सलाबाई काळे ही महिला, सरपंचपद स्त्रियांसाठी राखीव नसतानाही सरपंच झाली ही गोष्ट गावकरी व गावकमिटीतील लोकांना अपमानकारक वाटली. म्हणून वत्सलाबाई काळे यांना आणि त्यांच्या कुटुंबियांना चारित्र्यहनन, बहिष्कार आदि मार्गांने त्यांनी त्रास दिला. त्यांच्याशी इतरांनी कोणताही व्यवहार करू नये म्हणून इतरांनाही धाकदपटशाने वत्सलाबाई काळे यांना त्रास देण्यास भाग पाडले, वगैरे बाबी लेखिकेने विस्ताराने लिहिल्या आहेत. हातातील सत्ता स्त्रियांकडे जाते आहे असे पाहून धोंडमाळ गावातील वायकर काळेच विथरतात असे नव्हे, तर हस्तिनापुरातील शरद, मुलायमसिंग यांसारखे यदुकुलनंदनही आक्रस्ताळेपणा करतात, आणि इतरांचीही त्याला छुपी साथ असते. हे लोकसभेत ३३ टक्के महिला आरक्षण बिलाच्या मांडणीच्या वेळी दर वेळी दिसून येत आहे. लोकसभेत वावरणारे स्वतःला प्रगल्भ मानतात, पण देशाच्या ध्येयधोरणासंबंधीच्या निर्णयप्रक्रियेत स्त्रियांना स्थान मिळणार, आणि ताबडतोबीने नव्हे पण हळूहळू का होईना पुरुष म्हणून वापरता येणारी अमर्याद सत्ता जाणार या कल्पनेनेच लोकसभेतील स्वतःला बुद्धिमान मानणारा वर्ग घायकुतीला येतो. ग्रामीण भागात, निदान, ३३ टक्के महिला आरक्षणाला त्वरित मान्यता दिली गेली.

'रिपब्लिकन पक्ष शून्य विश्वासार्हतेच्या विळख्यात' हे एका प्रकरणाचे नाव 'बंबई रातके बाहोंमे' टाइप सनसनाटी आहे. मुळात कोणत्याही राजकीय पक्षाच्या विश्वासार्हतेचे गमक काय आहे? लेखिकेने लिहिले आहे की, लोकांना दैनंदिन जीवनातील सुरक्षा देण्यास रिपब्लिकन पक्ष कमी पडला. दलित कार्यकर्त्यांना सामाजिक प्रतिष्ठा नसते. त्याला पोलिस-चौकीतही प्रतिसाद मिळत नाही. यात कार्यकर्त्यांचा दोष नसतो.



अनुक्रमणिका

पण प्रतिसाद न मिळाल्याने कार्यकर्त्यांत निराशा येते (पान ७९). यासंबंधात हे लक्षात घेतले पाहिजे की, दलित चळवळींचा प्रारंभ किंवा त्यांच्या पक्षाची स्थापनाच माणूस म्हणून ताठ मानेने जगता येण्यासाठी झाली आहे. जन्माधिष्ठित जातीयतेवर आधारित समाजरचनेमधे त्यांना तुच्छ लेखले जाते. ही जाण दलित कार्यकर्त्याला कशी नसेल? समाजमनाचे परिवर्तन पोलीसचौकीद्वारा होणार नाही, हे दलित कार्यकर्ते खूप उमजून असतील. लेखिका जे निष्कर्ष वेळोवेळी काढते ते अगदीच वरवरचे वाटतात.

काँग्रेस पक्षाबाबत लेखिका म्हणते की, त्या पक्षाला लाभलेली विश्वासार्हता, त्या पक्षातील व्यक्तींपेक्षा त्या पक्षाने निर्माण केलेल्या संस्थांमुळे येते. पक्षाने उभारलेल्या शाळा, सहकारी संस्था वगैरे.... (पान ८०-८१) स्वातंत्र्यपूर्वकाळापासून काँग्रेसपक्ष हा सर्व-समावेशक पक्ष होता. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यावर सर्व देशभरात काँग्रेसची सत्ता आली. त्या सत्तेच्या आधाराने काँग्रेसने ग्रामीण भागातूनही सहकारी संस्थांचे जाळे उभारले. ही सुरुवातीची गोष्ट. आता उलट प्रवाह सुरू होऊनही कितीतरी निवडणूका पार पडल्या. आता सहकारी संस्थांवर तावा ठेवणे आणि त्या आधाराने राजकीय सत्ता प्राप्त करणे हेच तंत्र झाले आहे. मिळालेली राजकीय सत्ता पुन्हा ग्रामीण भागातील संस्था ताब्यात ठेवण्यासाठी आणि स्वतःचा व स्वकीयांचा लाभ करून घेण्यासाठी वापरणे हे तंत्र काँग्रेसला अवगत झाले, म्हणून त्याला राजकीय विश्वासार्हता प्राप्त झाली असे म्हणता येईल काय?

महात्मा गांधींविषयी लेखिकेचे म्हणणे असे की, आपल्या संपूर्ण वाटचालीत त्यांनी चातुर्वर्ण्याबाबतचे स्वतःचे आग्रह सोडले नाहीत. स्त्रियांसाठी त्यांनी ब्रह्मचर्याचा विचार मांडला. यात एक उद्धाराची भावना होती वगैरे (पान ८४-८५). आता यासंबंधी काय म्हणणार? स्वातंत्र्यलढ्यात स्त्रिया उघडपणे आणि मोठ्या प्रमाणात उतरल्या त्या महात्मा गांधींच्या काळात आणि त्यांच्याचमुळे. शारीरिक शक्तीपेक्षा आत्मशक्ती श्रेष्ठ आहे हे महात्मा गांधींनी नेहमीच मानले. आणि या आत्मशक्तीच्या क्षमतेबाबत दुर्बळ-सबळ, स्त्री-पुरुष हा भेद असू शकत नव्हता. लेखिकेच्या इतर अनेक निष्कर्षांपैकी महात्मा गांधींविषयीचा निष्कर्षही लेखिकेच्या मनात आलेला एक विचार एवढेच म्हणता येईल.

भारतीय रिपब्लिकन पार्टी, काँग्रेस पक्ष इत्यादि पक्षांचे राजकीय स्वरूप, आणि त्यांतील स्त्रियांचे स्थान, राजकारणातील स्त्रियांचे स्त्री म्हणून होऊ शकणारे शोषण, इत्यादि विविध विषयांवर लेखिकेने आपले विचार मांडले आहेत. त्याचप्रमाणे, महिलांच्या प्रश्नावर 'ब्र' ही न काढणाऱ्या भारतीय जनता पार्टी आणि शिवसेना या पक्षांची युती जेव्हा काँग्रेसला सत्तेवरून हटवून सत्तेवर येते तेव्हा या सत्ताबदलाचे स्वागत मंत्रालयातील नोकरदार स्त्रिया भगव्या साड्या नेसून करतात त्याचे लेखिकेला सखेद आश्चर्य वाटते (पान १२८). आणि याचे लेखिकेला असे कारण वाटते की, धार्मिक घोषणांच्या आवरणात शीला किणीसारख्यांचे अश्रु दिसण्याची शक्ती व संवेदनक्षमता बधिर होते. आणि तरीही नंतरच्या काळात त्याच राजकीय पक्षात लेखिका प्रवेश करते. हा प्रवेश बहुधा *नारीपर्व* प्रकाशित झाल्यानंतरच्या काळात आहे. पण नंतरच्या काळातसुद्धा युतीचे स्वरूप बदललेले नाही. लेखिकेचा शिवसेनेत प्रवेश आश्चर्यकारक वाटला असला तरी तो अनपेक्षित नाही. कारण कोणत्याही सामाजिक-राजकीय मार्गक्रमणाची दिशा एकदम बदलत नसते. क्रांतिकारी महिला संघटनेतून रिपब्लिकन पक्ष, रिपब्लिकन पक्षातून मध्यममार्गी काँग्रेसमधे प्रवेश, आणि काँग्रेसमधून प्रतिक्रांतिकारी शिवसेनेत प्रवेश हा प्रवास क्रमाक्रमाने सत्ताधारी पक्षाच्या निकट जाण्याच्या दिशेनेच झाला आहे. *नारीपर्व* मधील संदिग्ध मांडणी आणि त्यातून लेखिकेने काढलेले निष्कर्ष यातून लेखिकेच्या घडणीचे संकेत मिळतात.

स्त्री-मुक्तीचे अंतिम ध्येय मानवमुक्ती हे लेखिकेने मांडलेले तत्त्व बरोबरच आहे. त्यासाठी व्यापक पाया किंवा आधार राजकारणातून, राजकीय पक्षांमधे क्रियाशील होऊन मिळेल हे लेखिकेचे प्रतिपादनही ठीकच आहे. पण क्रियाशील राजकारणामधे सत्ताधारी राजकीय पक्षाकडे विश्वासार्हता असते असे मानणे बरोबर नाही. सत्ताधारी राजकीय पक्ष पुनरूज्जीवनवादी असू शकतो. सर्व पुनरुज्जीवनवादी पक्ष धर्माच्या आधाराने वाढतात आणि सर्व धार्मिक ग्रंथांतील स्त्रीचे स्थान दुय्यम असते.

*नारीपर्व* तील विषयांच्या मांडणीतून स्त्री-मुक्ती चळवळीला स्वच्छ वैचारिक दिशादर्शन होईल असे मानणे बरोबर ठरणार नाही.

***सुलोचना वाणी***

अनुक्रमणिका








**न्यू ह्यूमनिझम : ए रेव्हेल्यूशनरी फिलॉसफी** – डी.डी. बंदिष्टे, न्यू एज इंटरनॅशनल लि., नवी दिल्ली; रु. १५०/-

माझे मित्र डॉ. बन्दिष्टे यांनी एक महत्त्वाची कामगिरी उत्तम रीतीने पार पाडली आहे. मानवेन्द्रनाथ रॉय यांचा समग्र विचारव्यूह अवघ्या उण्यापुऱ्या दोनशे पानांच्या पुस्तकात सोपा करून मांडला आहे. प्रचलित सर्वमान्य विचारप्रणालींचा आवाका पाहिला तर रॉय यांचे कित्येक विचार अत्यंत धक्कादायक ठरतात. ते नीटपणाने समजायचे असतील तर रॉय यांच्या सुमारे दहा-पंधरा ग्रंथांचा लक्षपूर्वक अभ्यास करावा लागतो. त्यामुळे रॉय यांचा नवमानवतावाद एकाच सुटसुटीत पुस्तकात मिळणे ही अभ्यासकांची फार मोठी सोय म्हटली पाहिजे.

असले पुस्तक लिहिणाऱ्या प्रा. डी.डी. बन्दिष्टे यांना अर्थातच मुळात रॉय यांचे महत्त्वाचे सर्व ग्रंथ अभ्यासावे लागले. प्रा. बन्दिष्टे हे जन्मभर इंदूरच्या एका कॉलेजामध्ये तत्त्वज्ञानाचे शिक्षक होते. रसेल हा त्यांचा आवडता तत्त्वज्ञ. तोच त्यांचा डॉक्टरेटसाठीच्या प्रबंधाचाही विषय होता. निवृत्तीच्या सुमाराला त्यांच्या मनात आले की, मानवेन्द्रनाथ रॉय यांचे नवमानवतावादाचे तत्त्वज्ञान काय आहे हे एकदा व्यवस्थित समजून घ्यावे. त्यासाठी अभ्यास करण्याची त्यांची तयारी होती. मग दिल्लीला बॅ. तारकुंडे यांना लिहून त्यांनी रॉय यांचे ग्रंथ कोठे वाचायला मिळतील याची चौकशी केली. त्यांनी डॉ. इन्दुमती पारीख यांचा मुंबईचा पत्ता व फोन नंबर बंदिष्ट्यांना कळवला. त्यानुसार इन्दुताईंना डॉ. बन्दिष्टे भेटले. पण इन्दुताईंनी स्पष्ट सांगितले : "हे पहा, माझ्याकडे सगळी पुस्तके आहेत, पण एकही पुस्तक मी तुम्हाला घरी वाचायला देणार नाही. इथे येऊन वाचावी लागतील." ही अट मान्य करून कित्येक दिवस डॉ. बन्दिष्टे हे साहित्य वाचत राहिले. त्या अभ्यासात त्यांनी काढलेल्या टिपणांतून हे पुस्तक लिहिण्यासाठी सर्व सामुग्री त्यांच्याकडे जमली. अशी या पुस्तकाच्या निर्मितीची कथा आहे. डॉ. बन्दिष्टे यांच्या चिकाटीचे हे फळ आहे.

डॉ. अमर्त्य सेन म्हणतात : "I wanted to go back to my interest in Sanskrit and Indian classical tradition, and yet to be concerned with some of my more modern concerns like rationality, objectivity and social change, social justice. One of my grumbles is, we take such a biased view of India's past mainly to distinguish it from the West -- to make it look as if it is very different. There is no other literature in the world which has as much aesthetic, materialistic, rationalistic writings as Sanskrit and Pali together has and have. I think that tradition of heterodoxy, of questioning, is a very important past of Indian part and I think when we deny that .... I think we make a terrible mistake."

मला वाटते तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आणि केवलानन्द यांच्या विचारसरणीमागे हेच सूत्र होते. नवमानवतावादाचा विचारही म्हणूनच भारतीय विचारमंथनाशी विसंगत म्हणता येत नाही. त्याला पाश्चिमात्य किंवा उपरा मानणे अन्याय्य ठरेल. मानवेन्द्रनाथ रॉय यांनी बुद्धिवाद व निरीश्वरवाद यांना आधुनिक शास्त्राचा – विशेषतः उत्क्रांतिवादाचा – आधार देऊन कसे भक्कम पायावर उभे केले आहे हे प्रा. बन्दिष्टे यांनी सुरवातीलाच चपखल रीतीने दाखवून दिले आहे. ते म्हणतात, "As a result of evolution, what we call rationality has emerged from the primordial matter itself. Roy finds rationality inherent not only in all living beings but also in material existences. Of course its manifestations differ at various levels. All this has important implications. Not only has the mind- matter dualism gone but also gone is the idea of animal and material existences as hurdles in the path of spiritual achievement." (Page 39)

या तऱ्हेची रॉय यांच्या ontology ची ओळख करून देऊन क्रमाक्रमाने प्रा. बंदिष्टे वाचकाला मानवाच्या व्यक्तिमत्वाविषयीच्या विचारांकडे घेऊन जातात. त्यातल्या आत्म्याच्या विचाराने घातलेला धुमाकूळ दाखवतात. कर्मसिद्धान्त त्यातच येतो. माणसाची विवेकशीलता, नीती आणि स्वातंत्र्याकांक्षा या त्याच्या व्यक्तिमत्वातील महत्त्वाच्या गोष्टी






रॉय मानतात. त्यांच्या पायावरच रॉयचे नीतीशास्त्र, इतिहास-मीमांसा आणि सामाजिक तत्त्वज्ञान उभे आहे. रॉय यांच्या मते ज्ञान म्हणजे आत्मा किंवा देवाविषयीचे ज्ञान नव्हे. वस्तुस्थितीशी जे जुळते ते सत्य. जोपर्यंत ते असत्य सिद्ध होत नाही तोपर्यंत ते सत्य म्हणून स्वीकारले पाहिजे. भविष्यात नव्या ज्ञानाच्या प्रकाशात जर पूर्वीचे सत्य टाकून द्यावे लागले तर ते टाकून नवे ज्ञान स्वीकारले पाहिजे. रॉय यांच्या नीतीशास्त्रात स्वातंत्र्य हे सर्वश्रेष्ठ मूल्य मानले आहे. इतर अशीच मूल्ये म्हणजे सत्य आणि ज्ञान. सामान्य माणसाच्या जीवनात या मूल्यांचा विजय होताना दिसला, अंधश्रद्धा, अज्ञान व खुळ्या समजुती कमी कमी होत गेल्या म्हणजे तो समाज प्रगत होत आहे असे समजावे. राष्ट्र गौरवाच्या खोट्या गोष्टी संपल्या पाहिजेत. परस्पर सहकार्य, जीवनेच्छा, प्रेम, साहस, उदार दृष्टिकोन याही गोष्टी प्रगत समाजात असतात. या गुणांचा प्रसार आणि स्पर्धात्मक, गर्वावर आधारलेल्या प्रवृत्तींचा संकोच प्रगत समाजात होतो. स्वातंत्र्याचा अनुभव सामान्य माणसाला येणे ही प्रगत समाजाची मुख्य खूण आहे.

इतिहास हा नेहमी प्रगतीच दाखवतो असे नाही. इतिहासात असा नियतीवाद पहाणे चुकीचे आहे. माणूसच स्वतःचा इतिहास घडवत असतो. तो चुकीच्या मार्गाने गेल्यास समाजाची अधोगती होणे अटळ आहे.

राजकीय तत्त्वज्ञानामध्ये रॉय यांनी प्रातिनिधिक लोकशाहीचा त्याग करून लोकांनी स्वतःच आपला कारभार पहावा अशी प्रत्यक्ष लोकशाहीची संकल्पना मांडली आहे. राजकीय सत्ता प्रतिनिधींच्या हाती सुपूर्द केली की, लोकशाहीचा अंत होतो. आर्थिक क्षेत्रात रॉय यांनी सहकारी अर्थशास्त्राचा पुरस्कार केला. या सर्व प्रकारच्या प्रगतीसाठी लोकशिक्षणावर रॉय यांचा भर आहे. अशा तऱ्हेने सामाजिक, राजकीय, आर्थिक क्षेत्रात क्रांती घडवून आणणे हाच नवमानवतावादाचा विचार आहे.

***विश्वास नाईकनवरे***

---

**सरदार पटेल आणि भारतीय मुसलमान** – मूळ इंग्रजी लेखक : रफिक झकेरिया, अनुवाद : एकनाथ बागूल; श्री विद्या प्रकाशन, पुणे, रु. १५०/-

---

सार्वजनिक जीवनाचे अधःपतन होत असलेल्या या काळात मागच्या पिढीतील निःस्वार्थीपणे कार्य केलेल्यांची सतत आठवण येत असते. कारण ज्यांच्यापासून स्फूर्ती घ्यावी अशा नेत्यांची उणीव भासत आहे. म्हणून आपण इतिहासातल्या पानांत अशा निस्पृह व्यक्तींच्या शोधात असतो. अशा काही स्फूर्तिदायक व्यक्तींच्यापैकी सरदार पटेल यांचे नाव समोर येते. गांधी-नेहरुंबरोबर काम केलेल्या पटेल यांनी आधुनिक व अखंड भारताचा पाया घातला. परंतु धर्मवाद व जातीयवादाची टोकाची भूमिका घेणाऱ्या काही हितसंबंधियांना थोर व्यक्तींच्या चरित्रहननात आसुरी आनंद मिळत असतो. म्हणून जे आहे ते तसे समोर न ठेवता आपल्याला हवी तशी प्रतिमा निर्माण करण्याचा अट्टाहास ते करत असतात. त्याचेच एक उदाहरण म्हणजे 'सरदार पटेल हे मुस्लिमांचे कट्टर द्वेष्टे होते' असे विधान करून जनसामान्यांची व अभ्यासकांची केलेली दिशाभूल. रफिक झकेरियांसारखे अभ्यासू हे आव्हान स्वीकारून नेमकी सत्य परिस्थिती काय होती हे वाचकासमोर मांडतात. *सरदार पटेल अँड इंडियन मुस्लिम्स* हे या संदर्भातील रफिक झकेरिया यांचे पुस्तक असून याचा सुरेख अनुवाद एकनाथ बागूल यांनी केला आहे.

रफिक झकेरिया यांनी सरदार पटेल यांचा पत्रव्यवहार, चरित्रग्रंथ व इतर साहित्य अभ्यासून त्यांचे एक परिपूर्ण व्यक्तीचित्र वाचकांसमोर उभे केले आहे. झकेरिया यांचा मुख्य भर सरदार पटेल यांची मुस्लिमांबद्दलची भूमिका काय होती, त्यात कसा बदल होत गेला, त्यांची कृतीची दिशा कोणती होती यावर आहे. एका टोकाला बॅ. जीनांसारखे कडवट मुस्लिम नेते, दुसऱ्या टोकाला येनकेन प्रकारे ब्रिटिश साम्राज्याचे हित पाहणारे ब्रिटिश मुत्सद्दी, व तिसऱ्या टोकाला गांधी-नेहरू-पटेल यांसारखे तळमळीने काम करणारे नेते अशी

अनुक्रमणिका

अवस्था असल्यामुळे स्वातंत्र्यासंबंधीच्या कुठल्याही प्रश्नाचे उत्तर सहजासहजी सापडत नाही. सुदीर्घ चर्चा, वाद-विवाद, निर्णय व कृती यातूनच संबंधित व्यक्तींबद्दल माहिती मिळवणे शक्य आहे. परंतु त्यातून संपूर्ण व्यक्ती आपल्यासमोर येत नाही. म्हणूनच या सर्व व्यक्तींबद्दल अनेक समज-गैरसमज आहेत. खरे पाहता सरदार पटेल हे शेतकरी कुटुंबातून आलेले कृतीशील, साधे व सरळमार्गी होते. गांधीजींच्या सहवासात आल्यानंतर त्यांच्या राहणीमानात आमूलाग्र बदल झाला. बौद्धिक कसरती त्यांना आवडत नव्हत्या. शेतकरी कुटुंबात वाढल्यामुळे प्रत्येक गोष्टीकडे वास्तव दृष्टिकोनातून पाहण्याची एक नजर तयार झाली होती. राजकारणात हिंदू-मुस्लिम असे भेद ते कधी करत नव्हते. परंतु बॅ. जीनांसारख्या कडवट व हेकेखोर मुस्लिम नेत्याची वागणूक त्यांच्या सहनशक्तीला आव्हान देत होती. म्हणूनच त्यांच्या वक्तव्यातून मुस्लिम विरोध डोकावत असे. जयप्रकाश नारायण व मौलाना आझाद या नेत्यांना पटेल कदाचित मुस्लिमविरोधी असू शकतील असे वाटत होते. परंतु पटेलांची वागणूक हिंदूधार्जिणी नव्हती हे पटल्यानंतर या नेत्यांनी आपली चूक स्पष्ट शब्दांत कबूल केली. या सर्व घटनांचा लेखकाने छानपणे आढावा घेतला आहे.

फाळणीच्या वेळी घडलेला नरसंहार हा मनुष्यजातीला काळिमा फासणारा प्रसंग होता. असे का घडले, कुणी घडवले, त्याला जबाबदार कोण, हे टाळता येणे शक्य होते का, असे अनेक प्रश्न हे पुस्तक वाचताना डोकावतात. या भयंकर शोकनाट्यातील प्रत्येक पात्राची मानसिक अवस्था, त्यांनी घेतलेले निर्णय, त्यांच्या हातून घडलेल्या कृती, त्यांचे परिणाम व कारणमीमांसा हे सर्व वाचताना आपण एका काळ्याकुट्ट कालखंडातून गेलो याची जाणीव होते. पाकिस्तानने स्वतःला मुस्लिम राष्ट्र म्हणून घोषित केल्यामुळे भारतानेसुद्धा हिंदू राष्ट्र म्हणून घोषणा करावी असे पटेलांसारख्या नेत्यावर दडपण येत असे. परंतु या दडपणांना बळी न पडता अल्पसंख्यांकांचे रक्षण हे बहुसंख्यांकांचे कर्तव्य आहे याची जाणीव पटेल यांनी करून दिली. प्रशासनाच्या बाबतीत त्यांनी घेतलेले निर्णय व त्यांची अंमलबजावणी यामुळे अधिक जीवितहानी झाली नाही असे त्यावेळच्या अनेक अधिकाऱ्यांनी नमूद केले आहे.

पाचशेच्या वर छोट्यामोठ्या संस्थानिकांमध्ये विभागलेला प्रदेश भारतात समाविष्ट करून घेण्यासाठी पटेल यांनी दाखवलेली मुत्सद्देगिरी, त्यांच्यातील त्यावेळी व्यक्त होत झालेला प्रखर राष्ट्रवाद व अशा प्रसंगातसुद्धा हिंदू-मुस्लिमात बंधुभाव निर्माण करण्यासाठी त्यांनी घेतलेले कष्ट याचे वर्णन लेखकाने समर्पकपणे केले आहे. सरंजामी स्वरूपात असलेल्या संस्थानिकांच्या प्रश्नाला जातीय रंग देण्याचा कुटील डाव रचण्यात आला होता. हैदराबाद संस्थानाचा प्रश्न कासीम रझवीच्या गुंडगिरीमुळे जास्त चिघळला होता. परंतु पटेल यांनी मनाचा समतोल ढळू न देता योग्य पाऊल उचलून तो प्रश्न निकालात काढला.

उर्दू भाषेला राज्यभाषा म्हणून मान्यता देताना पटेल यांनी त्याकडे एक धर्मभाषा म्हणून न बघता साहित्य, संस्कृती व संपर्क माध्यम म्हणून बघितले. घटना समितीच्या बैठकीत कुठल्याही गटाकडे झुकते माप देण्याचे ते टाळत होते व राष्ट्रीय हित जपत होते. त्यावेळचे त्यांचे वक्तव्य ऐकून नेहरुसुद्धा भारावून जात. सरदार पटेल यांच्या प्रयत्नांमुळेच धर्मप्रचार, भाषा, लिपी व संस्कृती यांचे जतन करणे, शिक्षण संस्था चालवणे असे अधिकार अल्पसंख्यांकांना मिळाले. यासाठी पटेल यांना प्रखर विरोध सहन करावा लागला.

रफिक झकेरिया यांनी इतर अनेक लेखकांप्रमाणे आपल्या चरित्रनायकाच्या प्रत्येक कृतीचे समर्थन करण्याचा प्रयत्न केलेला नाही. पटेल यांचे मुस्लिमविषयक ज्ञान मर्यादित होते, धर्मनिरपेक्षतेपेक्षा सर्वधर्मसमभावावर त्यांचा विश्वास होता. सामाजिक जीवनात हिंदूंशी ते जास्त मोकळेपणे वागत होते असे नमूद करण्यास लेखकाला संकोच वाटत नाही. सरदार पटेल हिंदुत्ववादी होते असे म्हणणे त्यांच्यावर अन्याय केल्यासारखे होईल याची प्रचिती पुस्तक वाचून येते, यातच लेखकाचे यश दडले आहे.

*प्रभाकर नानावटी*

**आदिवासी विकासातील दीपस्तंभ** - डॉ. गोविंद गारे; श्री विद्या प्रकाशन; पुणे, रु. २२५/-

आहे त्या परिस्थितीशी जुळवून घेणे, परिस्थितीप्रमाणे स्वतःलाच आकार देणे, 'आहे हे असं आहे, यात बदल करण्याची गरज नाही' असं समजून आयुष्य कंठणे, हा स्वतःचं 'अस्तित्व' टिकवण्याचा एक सहजसुलभ मार्ग आहे. भोवतालच्या गरजेप्रमाणे आपण बदलत राहणे, समाजवास्तवाशी मिळतजुळतं घेऊन सर्वमान्य मूल्ये, रूढी, अंधविश्वास, कर्मकांडे, व्यावहारिक संकेत इत्यादी मान्य करणे व त्यांचे तंतोतंत पालन करणे हे केव्हाही विनधोक असते. परंतु काही धडाडीची माणसं ही प्रस्थापित पाऊलवाट सोडून वेगळ्या दिशेने जातात. मळलेल्या वाटेने न जाता नवीन वाट शोधत असतात. नवीन वाट तयार करतात. त्यात धन्यता मानतात. नवीन वाट तयार करणे व त्या वाटेच्या शेवटी काय असेल याचा शोध घेणे, यातून त्यांना आनंद मिळतो. यशापयशाची चिंता त्यांना सतावत नाही. अशाप्रकारे प्रस्थापित जीवनापासून फारकत घेऊन नवीन वाटांच्या शोधात असलेल्या व आदिवासी क्षेत्रात काम केलेल्या काही कार्यकर्त्यांचा परिचय डॉ. गोविंद गारे यांनी *आदिवासी विकासातील दीपस्तंभ* या पुस्तकाद्वारे करून दिला आहे.

महाराष्ट्रातील आदिवासी प्रदेशात काम केलेल्या मागच्या पिढीतील काही निवडक कार्यकर्त्यांचा परिचय डॉ. गोविंद गारे यांनी यापूर्वी *आदिवासी विकासाचे शिल्पकार* (श्री विद्या प्रकाशन, १९९१) या पुस्तकामधून करून दिला होता. ठक्कर बाप्पा, गोदावरी परुळेकर, आचार्य भिसेगुरुजी, अनुताई वाघ, बाळासाहेब देशपांडे, अंबरसिंग महाराज इत्यादी कार्यकर्त्यांच्या जीवनपटाचा वेध घेणारे हे पुस्तक वाचताना त्यांच्या निस्वार्थपणाची, श्रमांची, कार्याची व चिकाटीची कल्पना येते. कालांतराने या समस्या राहणार नाहीत असेही वाटत होते. परंतु डॉ. गारे यांची पुस्तके वाचताना सामाजिक व आर्थिक स्वांतत्र्यासाठी आपल्याला फार मोठा पल्ला गाठायचा आहे हे लक्षात येते. अजून आपण नुसते चाचपडत आहोत. या नव्या जाणीवेने प्रेरित होऊन अनेक कार्यकर्ते महाराष्ट्रभर ठिकठिकाणी संघर्ष करत आहेत. डॉ. गारे यांनी आपल्या या पुस्तकाद्वारे अशा चाळीसएक कार्यकर्त्यांचे चित्र आपल्यासमोर उभे केले आहे. डॉ गारे यांनी हे सर्व चरित्रसाहित्य गोळा करण्यासाठी घेतलेल्या परिश्रमाची कल्पना पुस्तक वाचताना लक्षात येते.

यात वर्णन केलेल्या कार्यकर्त्यांना या क्षेत्रात काम करण्यासाठी मिळालेली प्रेरणा, स्थूलमानाने, गांधीवादी-सर्वोदय विचार, राष्ट्र सेवादलाचे संस्कार, साम्यवादी विचार, व हिंदू वा ख्रिश्चन धार्मिक विचार, यापैकी एखाद्यातून मिळालेली आहे. एकीकडे सेवा, मदत, त्याग यावर भिस्त असलेले कार्यकर्ते आहेत. तर दुसरीकडे जनसंघटन, आंदोलन, संघर्ष यावर भर देणारे कार्यकर्ते आहेत.

बाळूभाई मेहता, ताराबाई मोडक, खेजीभाई चौधरी, भूमीसेनेचे काळूराम धोदडे, लोकबिरादरीचे डॉ. प्रकाश व मंदा आमटे, मेधा पाटकर, विवेक व विद्युल्लता पंडित इत्यादींच्या कार्याची ओळख करून देणारे लेख मुळातूनच वाचावयास हवेत. बाळूभाई मेहता यांना खानदेशाचे गांधी असेच संबोधले जात असे. गांधीजींच्या सर्वोदय विचारांना कृतीरूप देणे हेच त्यांचे ध्येय होते. शिक्षकांना प्रशिक्षणाची व्यवस्था, आदिवासी ग्रामोद्योग अशा योजना त्यांनी राबविल्या. त्यातून आदिवासी आत्मनिर्भर होतील हे पाहिले. ताराबाई मोडक यांनी बालशिक्षण हेच जीवनकार्य मानून या क्षेत्रात आदिवासींच्यात राहून अनेक प्रयोग केले. बालवाडी, आंगणवाडी या संकल्पनांना मूर्तरूप देऊन महाराष्ट्रभर त्याची अंमलबजावणी करण्यास शासनाला उद्युक्त केले.

मनोरचे काळूराम धोदडे यांनी आदिवासी समाजासाठी दिलेला लढा, स्वातंत्र्यपूर्व काळातील कुठल्याही स्वातंत्र्य-योद्ध्याच्या लढ्यापेक्षा तसूभरही कमी नाही. गोदावरी परुळेकरांचा, साम्यवादी विचारांचा पगडा धोदडे यांच्यावर होता. प्रस्थापितांविरुद्ध लढण्यासाठी आदिवासींची भूमीसेना नावाची संघटना त्यांनी उभी केली. या भूमीसेनेने सामूहिक गुंडगिरी मोडून काढली. शेतमजुरांच्या किमान वेतनासाठी लढा दिला. कुळकायद्याची अंमलबजावणी करण्यास शासनाला भाग पाडले. गावोगावी तरुण मंडळांची, मजूर संघटनांची स्थापना केली. लग्नाचा खर्च कमी करण्यासाठी आदिवासींच्या-मध्ये सामूहिक लग्नाची प्रथा रुजविली.

माडिया गोंड या आदिवासी जमातीच्यामध्ये राहून हेमलकसा या छोट्या गावाच्या परिसरात बाबा आमटे यांचा लोकबिरादरीचे प्रकल्प राबविणारे डॉ. प्रकाश व डॉ. मंदा आमटे यांचे नाव परिचित आहे. डॉ. गारे यांचा या दांपत्यावरील लेख आपल्याला परत एकदा त्या माडियांच्या रम्य परिसरात

फिरवून आणतो. नर्मदा बचाव आंदोलनाच्या मेधा पाटकर यांनी प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाचा प्रश्न धसास लावला आहे. मार्केट संस्कृतीशी संबंध नसलेल्या तडवी, वसावा, पावरा या प्रकल्पग्रस्त आदिवासी जमातींना न्याय मिळवून देण्यासाठी जिवाचे रान करत आहेत. केवळ पुनर्वसन हा प्रकल्पग्रस्तांच्या प्रश्नावर तोडगा होऊ शकत नाही या मताचा पाठपुरावा त्या करत आहेत. वर्ल्ड बँकसुद्धा विकास प्रक्रियेपेक्षा सावकाराचीच भूमिका बजावत आहे याची त्यांना चीड येते. धरणग्रस्तांच्या जैविक संस्कृतीचे अस्तित्व नाकारणाऱ्या, सरकारी दृष्टिकोनातून केल्या जाणाऱ्या विनाशकारी विकासाविरुद्ध नर्मदा बचाव आंदोलनाचा हा लढा आहे.

वसई, पालघरच्या परिसरात काम करणारे विवेक व विद्युल्लता पंडित या दांपत्याबद्दलचा लेख वाचताना आपण एखाद्या सिनेमाची स्क्रिप्ट तर वाचत नाही ना, असे वाटते. सत्य हे कल्पनेपेक्षा जास्त धक्कादायक व दाहक असू शकते याची प्रचीती येते. कुठल्याही मागासलेल्या प्रदेशात शिक्षण, आरोग्य इत्यादी छोट्यामोठ्या कल्याणकारी योजना राबविणाऱ्या कार्यकर्त्यांचे त्या गावातील प्रतिष्ठित वर्ग उत्साहाने स्वागत करत असतो. शक्य तेवढी मदतही केली जाते. परंतु या प्रतिष्ठितांच्या शोषणव्यवस्थेवर बोट ठेवण्याचा प्रयत्न केल्यास त्यांच्या कुटील कारस्थानांना सीमा राहत नाही. त्यात कोण कोण किती बळी पडतील याचा अंदाज करता येत नाही. 'विधायक संसदे' द्वारे अशा विषमव्यवस्थेचे वाभाडे काढणारे प्रश्न घेऊन लढा देणाऱ्या या दांपत्याला अनेक कष्ट भोगावे लागले. वेळी प्रसंगी ते उपाशी राहिले. त्यांना मारहाण झाली. रातोरात बेघर झाले. जेलमध्ये गेले. तरीही त्यांनी हार मानली नाही. एस.एम.जोशी, सदानंद व सुधा वर्दे यांनी त्यांचे मनोबल वाढविले. वेठबिगारीतून आदिवासी मुक्त होतात, परंतु त्यांचे नीटसे पुनर्वसन होत नाही ही त्यांची व्यथा आहे.

या कार्यकर्त्यांव्यतिरिक्त आदिवासींच्याबद्दल सहानुभूतीने काम केलेले बाळासाहेब खेर, मधुकरराव पिचड, विठ्ठलराव गेडाम यांच्याबद्दलचे लेख या संग्रहात आहेत. प्रसिद्धीवलयाच्या बाहेर असलेले परंतु तळमळीने व जिद्दीने काम केलेले कॉ. बी.के. देशमुख, बळवंत अग्निहोत्री, दामोदरदास मुंदडा, शेमुअल चव्हाण, महाजन गुरुजी, दादासाहेब लिमये इत्यादींच्या कार्याचा व जीवनाचा आढावा घेतला आहे.

डॉ. गारे यांची आदिवासी कार्यकर्त्यांबद्दलची दोन्ही पुस्तके वाचताना काही गोष्टी प्रकर्षाने जाणवतात. विसाव्या शतकाच्या शेवटी असा एखादा समाज, अशी एखादी जमात पुढारलेल्या महाराष्ट्रात असू शकते, याची कल्पनाच करवत नाही. सर्वात महत्त्वाचे म्हणजे या समाजाला आपल्यावर अन्याय होत आहे, आपले शोषण होत आहे, आपल्या गरीबीचे कारण दुसरे तिसरे काही नसून शोषणावर जगणारा जंगल ठेकेदारांचा, अरण्य खात्यातील नोकरांचा प्रतिष्ठित समाज आहे, याची जाणीवच नाही. १५ ऑगस्ट, २६ जानेवारी म्हणजे नेमके काय असते, भारताला स्वातंत्र्य मिळाले म्हणजे काय झाले हे अजूनही समजावून सांगावे लागते. हा समाज व्यसनाधीन व निरक्षर राहावा म्हणून अनेक वेळा प्रयत्न केला जातो. सामाजिक कार्यात उतरलेल्या जिद्दी कार्यकर्त्यांना हे सहन होणे शक्य नाही. त्यांच्याबरोबर राहून, मिळून-मिसळून त्यांचीच भाषा बोलून हे कार्यकर्ते त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण करत असतात. जीवाला जीव देणारा हा समाज त्यामानाने अजून निरागस आहे. शहरी छक्के-पंजे कळत नाहीत. परंतु त्यांना खऱ्या अर्थाने मुख्य प्रवाहात आणण्यासाठी प्रगल्भ कार्यकर्त्यांची उणीव भासत आहे.

पायात चप्पल किंवा स्लीपर, काखेत शबनम व अंगावर जाडे भरडे कपडे घालून काम करणारे कार्यकर्ते नवीन पिढीच्या उपहासाचे विषय झालेले आहेत. इतरांविषयी बेपर्वा असणे व आपला स्वार्थ साधत राहणे यालाच शहाणपणा म्हणत असतील तर या पुस्तकात वर्णन केलेल्या सर्व व्यक्ती वेड्या आहेत असेच म्हणावे लागेल. परतु या 'वेड्यां'नी जागोजागी उभे केलेले नंदनवन पाहिल्यावर आपले जीवन कस्पटासमान आहे असेच वाचकाला वाटेल. इतरांच्या कार्याविषयी – त्यातही विधायक कार्याविषयी – तुच्छता बाळगणे व येताजाता कशाही शब्दांत ती व्यक्त करणे हा अनेकांचा स्वभाव बनलेला आहे. सार्वजनिक जीवनातून आदर्शवादी विचारांची झालेली पिछेहाट व सत्ता हेच साध्य मानून तिचा उघडपणे पुरवलेला पिच्छा, या गोष्टी समाजहितकारक नाहीत हे ठणकावून सांगणारे कार्यकर्ते आपल्याला हवे आहेत. डॉ. गारे यांची ही पुस्तके वाचून समाजकार्याची धुरा सांभाळणारी नवीन पिढी तयार होईल अशी आशा करू या.

*प्रभाकर नानावटी*

अनुक्रमणिका






**नव्या दिशा, बदलते संदर्भ** - माधव गोडबोले; श्री विद्या प्रकाशन, पुणे; रु. २००/-

माधव गोडबोले यांचे हे पुस्तक त्यांनी १९९५ ते १९९७ या काळात लोकसत्ता, सकाळ व महाराष्ट्र टाइम्स या दैनिकांसाठी वेळोवेळी लिहिलेल्या लेखनाचा संग्रह आहे. एके काळी आर्थिक, राजकीय, सामाजिक व प्रशासकीय घडामोडी, संघर्ष व त्यामागची भूमिका यांचा ऊहापोह अनेक साप्ताहिके, मासिके यामधून होत असे. परंतु काही कारणांमुळे वैचारिक नियतकालिके बंद पडत गेली. त्यामुळे सामाजिक जबाबदारीची जाणीव असलेली काही वृत्तपत्रे वैचारिक लेखांना प्रसिद्धी देऊ लागली. या मुद्रितमाध्यमातूनच आता वैचारिक विषयावर लेखन, चर्चा व प्रतिवाद होत आहे. वृत्तपत्रीय लेखनात शब्दमर्यादा व वृत्तपत्राची ध्येयधोरणे सांभाळून लेखन करावे लागते हे मान्य करूनही, अत्यंत माफक किंमतीत लेखकाचे विचार घरोघरी पोचतात ही त्यांची जमेची बाजू आहे. वृत्तपत्रेच आता विचारमंथन घडवून जनमत तयार करण्यास हातभार लावतात. वाचकांना संवेदनाक्षम बनवणे, त्यांच्या जाणीवा जागृत करणे, प्रश्नांचा चहूबाजूंनी विचार करण्यास लावणे या गोष्टी लोकशाही व्यवस्था बळकट करण्यास अत्यंत गरजेच्या आहेत.

माधव गोडबोले यांच्या या लेखसंग्रहात विविधता आहे. भारतीय अर्थव्यवस्था, महाराष्ट्रातील आर्थिक, सामाजिक व विकासाच्या आघाडीवरील घडामोडी, राजकीय स्थित्यंतरे, ध्येय-धोरणे, सोई-सुविधा इत्यादी अनेक विषयांवर त्यांनी प्रासंगिक लेखन केले आहे. केवळ माहितीच्या स्वरुपात हे लेख नसून लेखकाने काही उपायही सुचविले आहेत. अशा प्रकारच्या चर्चेमधून लेखकाला वाचकांची विचारशक्ती जागृत करणे हे अभिप्रेत आहे. प्रत्येक प्रश्नाला लेखकाकडे ठोस उत्तरे आहेत, असा लेखकाचा दावा नाही, परंतु प्राप्त परिस्थितीत त्या उपाययोजना योग्य आहेत, असे लेखकाला वाटते. लेखकाचा उद्देश केवळ कृतीकार्यक्रम वा उपाय सुचविणे हा नसून मुळात या समस्या कशा उद्भवल्या, त्यातून निर्माण झालेले प्रश्न व उत्तराची दिशा काय असू शकेल याची मांडणी त्यांनी केली आहे.

भारतीय अर्थव्यवस्थेच्या उदारीकरणामुळे अनेक समस्यांचा सामना करावा लागत आहे. इतके दिवस लोकांचा राजकोषीय समायोजना, महसुली तूट, देशांतर्गत व परकीय कर्ज इत्यादी गोष्टींचा दुरान्वयानेही संबंध येत नव्हता. परंतु बदलत्या आर्थिक परिस्थितीमुळे या सर्व गोष्टींचा पायाभूत सुविधा व विकास कार्यक्रमांवर फार मोठा परिणाम होत आहे. जागृत वाचकाने यातील बारकावे समजून घेणे गरजेचे आहे.

भारतात मुक्त अर्थव्यवस्था ही राज्यांशी विचारविनिमय न करता मागील दाराने आली आहे. अनेक वेळा राष्ट्रीय हित बाजूला सारून केवळ आपापल्या राज्यापुरतेच बघण्याचा दृष्टिकोन त्यामुळे रूजत आहे. राज्याराज्यातील प्रगतीची तफावत डोळ्यात भरण्याइतकी आहे. मुक्त अर्थव्यवस्थेत सबसिडी चालू ठेवणे धोक्याचे असते. परंतु सबसिडीच्या काठीशिवाय राज्यशासन एक पाऊलसुद्धा पुढे ठेवू शकत नाही. मुक्त अर्थव्यवस्थेतील ध्येयधोरणामुळे राज्यांना मिळणाऱ्या निधीत मोठी कपात झाली. ओव्हरड्राफ्टवरील बंधनामुळे राज्यांचे नुकसान होत आहे. केंद्र व राज्य शासनात समन्वयाचा अभाव असल्यामुळे वेळेवर निर्णय घेतले जात नाहीत. प्रत्येक गोष्टीबाबत चर्चेचे गुन्हाळ चालू ठेवावे लागते. सार्वजनिक उद्योगांचा प्रश्न दिवसें-दिवस बिकट होत आहे. विमा उद्योगाचे खाजगीकरण, सरकारी कर्मचाऱ्यांची वेतनवाढ, बोनसचा प्रश्न अशा आर्थिक व्यवस्थेशी संबंधित असलेल्या प्रश्नांचे विश्लेषण लेखकाने केले आहे. स्वच्छ व पारदर्शी प्रशासनाच्या अभावामुळे राज्यकर्ते व समाज यात मोठी दरी निर्माण होत आहे. वेळीच उपाययोजना न केल्यास जनतेचा लोकशाहीव्यवस्थेवरचा विश्वास उडून जाईल. अर्थसंकल्पीय अधिवेशनात अंदाजपत्रक तयार केले जाते. लेखकाच्या मते हा एक कागदी घोडा आहे. यात केवळ निधीची मागणी असते. आकडेवारी व साल बदलून तीच तीच माहिती दिली जाते. अनावश्यक माहितीचाच भरणा असतो. अर्थसंकल्प हा केवळ जमा-खर्चाचा हिशोब व ताळेबंद नव्हे. त्यातून विकासाची दिशा, विकास प्रक्रिया व गतिशीलता व्यक्त व्हायला हवी. महसूल किती या पेक्षा कसा व कोणाकडून मिळणार आहे, हे महत्त्वाचे आहे. आपला अर्थसंकल्प म्हणजे धूळफेक असते. आकड्यांची कसरत करून खरे चित्र दृष्टीआड करण्याचा प्रयत्न केला जातो.

महाराष्ट्राच्या आर्थिक व राजकीय परिस्थितीचे एक विदारक चित्रच लेखकाने उभे केले आहे. झुणका-भाकर योजना,






स्वस्त घरे यासारख्या सवंग लोकप्रिय घोषणा राज्याला परवडणाऱ्या नाहीत, याचे भान राज्यकर्त्यांनी ठेवायला हवे. वीजमंडळाचा कारभार, वीजनिर्मितीबद्दलचे घोळ, एन्‌रॉन प्रकरण, मार्ग परिवहन मंडळ, वैधानिक विकास मंडळ, उपनगरीय रेल्वे योजना इत्यादी अनेक विषयांवर लेखकाने भाष्य केले आहे. वीज, रस्ते, पूल, बंदरे, पाटबंधारे, गृहनिर्माण इत्यादी क्षेत्रातील अनेक प्रकल्प खाजगीकरणातून राबविणे शक्य आहे. बिल्ड, ऑपरेट व ट्रान्स्फर या पद्धतीतून खाजगीकरणास वाव आहे. परंतु शासनाच्या धरसोड वृत्तीमुळे कामे नीट होत नाहीत. चर्चा, निर्णय, फेरनिर्णय असे अनेक घोळ शासन करत असल्यामुळे गुंतवणूकदार पुढे येत नाहीत.

महाराष्ट्राच्या प्रशासनातील उणीवांचाही लेखकाने उल्लेख केला आहे. येथे कायद्याचे राज्य आहे असे वाटत नाही. नवरात्रोत्सव, गणेशोत्सव, शिवजयंती हे सर्व आता गुन्हेगारांच्या ताब्यात गेले आहेत. पोलिस व शासन यंत्रणा या मांडव शोभेसारख्या वाटतात. लाल दिव्यांच्या गाड्यांची गुर्मी, पोलिसांची चोरांना, गुन्हेगारांना पकडण्याची टाळाटाळ इत्यादी लेखकाची मते शासनाच्या डोळ्यात अंजन घालणारी आहेत. 'सगळ्यांचे सोंग करता येते पण पैशाचे नाही' याचे भान ठेवून राज्य करायला हवे असे लेखकाला वाटते.

अण्णा हजारे यांची भ्रष्टाचार निर्मूलनाची चळवळ याच काळात जोरदार होती. इतर अनेक लेखकांप्रमाणे या चळवळीचा केवळ उदोउदो न करता, नेमके काय करायला हवे याचा विचार लेखकाने व्यक्त केला आहे. वैयक्तिक आकस, द्वेष, तक्रारी, चारित्र्यहनन हे न करता एखादी सक्षम यंत्रणा उभी करणे अत्यंत गरजेचे आहे. लोकायुक्तांचे अधिकार वाढविणे, प्रशासनात पारदर्शीपणा आणणे, माहिती मिळवण्याचा हक्क हे भ्रष्टाचार समस्येवर उपाय होऊ शकतात. केवळ तळमळ, प्रतिष्ठा व नैतिक अधिकार पुरेसे नाहीत असे लेखकास वाटते. आंदोलने, घंटानाद व गावसमिती यातून हा प्रश्न सुटण्यासारखा नाही.

लेखकाने आपली बाजू व्यवस्थितपणे व विचारपूर्वक मांडली आहे. जेव्हा हे लेख प्रसिद्ध झाले गेले तेव्हा त्याबद्दलच्या उलट सुलट प्रतिक्रिया उमटल्या असतीलच. अशा निवडक प्रतिक्रियांचा समावेश पुस्तकात केला असता तर वाचन अधिक सकस झाले असते. उदाहरणार्थ, बोनसच्यासंबंधी भाष्य करताना लेखकाला कामगार संघटनेचे नेतृत्व व्यावसायिकाकडे असावे की समाजवादी वा कम्युनिस्ट विचारसरणी असलेल्याकडे असावे हा प्रश्न पडतो. यावर विस्तृतपणे चर्चा घडू शकेल. सबसिडी, आदिवासींचा विकास, वैधानिक विकास मंडळ यासारख्या विषयांवरसुद्धा चर्चा होऊन दोन्ही बाजू समोर आल्यास वाचक जास्त सुजाण झाला असता.

वृत्तपत्राचे लेखन अनेक वेळा फार अल्पजीवी असते. परंतु या पुस्तकातील अनेक लेख व विषय अजूनही भरपूर ताजे वाटतात. कारण अजूनही त्याबद्दलची नेमकी दिशा सापडत नाही. त्यामुळे अशा प्रकारच्या वैचारिक लेखनांचा संग्रह असलेली पुस्तके वाचकांच्या हातात पडायला हवीत.

*प्रभाकर नानावटी*





अनुक्रमणिका







# पत्रव्यवहार

### अध्यात्म विषयातील बागूल यांची समज

श्री. देवीदास बागूल यांच्या *नवभारत* मधील पूर्वीच्या, सत्यापलाप करणाऱ्या दोन लेखांवर मी *नवभारत* ऑक्टो. १९९८ च्या अंकात टीका केली असून तिला त्यांनी नोव्हें.-डिसें. १९९८-च्या अंकात 'गळतगे यांची टीकापद्धती' या मथळ्याखाली 'उत्तर' दिले आहे. वास्तविक त्यांनी त्याला 'गळतगे यांची खोटारडी टीकापद्धती' असे म्हणावयास हवे होते. या 'खोटारड्या लेखना'चा लेखक म्हणून मला उत्तर दिले पाहिजे. ते मी येथे देत आहे.

खरेखोटे ठरविण्याच्या बौद्धिक चर्चेत, संपादकांना मध्ये घेऊन, 'ठोकण्या'ची भाषा करण्याची आवश्यकता बागूलांना का वाटते? सत्य काय हे ठरविणाऱ्या बौद्धिक चर्चेत 'ठोकण्या'चा संबंध कोठे येतो?

बागूलांचा माझ्यावर पहिला आरोप हा आहे की, मी रजनीशांच्या विचारांची समीक्षा करायची नाही असे 'ठरवून' 'ठरवल्या' प्रमाणे वागलो नाही. माझ्या लेखाचा उद्देश बागूलांच्या विधानांची – रजनीशांच्या विचारांची नव्हे – तपासणी करणे हा होता. रजनीशांचे उतारे त्यांनी आपल्या लेखात दिलेले असल्यामुळे, त्या उताऱ्यांच्या संदर्भात ती तपासणी करणे मला अपरिहार्य ठरले. बागूलांच्या लेखातील दोष दाखवताना रजनीशांच्या उताऱ्यांतील दोषांवर ते अवलंबून असतील तर ते अप्रत्यक्षपणे दाखवले जाणारच. लेखाचा उद्देश मात्र बागूलांचा सत्यापलाप उघडा करण्याचा आहे, रजनीशांचा नाही. लक्ष्य (target) बागूल आहेत; रजनीश नाहीत. आणि हेच मला माझ्या लेखाच्या पहिल्या परिच्छेदात सांगायचे आहे.

बागूल म्हणतात, "गळतगे यांनी म्हटले आहे की, शाळा-कॉलेजांमधील प्रयोगशाळांत विज्ञानाचे शोध लावण्याचे काम चालते. गळतगे ह्यांचे हे विधान खोटे आहे." (पृ. ९८) या बागूलांच्या विधानावर बागूलांना असा स्पष्ट प्रश्न आहे की, या अवतरणात बागूल "गळतगे ह्यांचे हे विधान" असे ज्या विधानाला उद्देशून म्हणतात ते गळतग्यांचे विधान बागूलांनी मुळातून उद्धृत का केले नाही? म्हणजे ते अवतरणचिन्हांत का ठेवले नाही? एखाद्या लेखकाच्या ज्या विधानावर टीका करायची असते ते विधान अवतरणचिन्हात उद्धृत करायचे असते. बागूल तसे येथे करीत नाहीत व नुसतेच 'गळतग्यांचे हे विधान' असे म्हणतात? याचे कारण ज्याला ते माझे विधान म्हणतात ते मुळात माझे विधानच नाही हे आहे! म्हणजे माझ्या माथी त्यांना खोटे (मी न केलेले) विधान मारायचे आहे. आणि तेही बुद्धिपुरःसर. कारण असे खोटे विधान माझ्या माथी मारल्याशिवाय त्यांचा युक्तिवादच उभा राहू शकत नाही. मी म्हटले आहे की, "प्रयोगशाळांमधून पूर्वी शास्त्रज्ञांनी लावलेले शोधच विज्ञानाचे विद्यार्थी पुनःपुन्हा लावतात." (*नवभारत*, ऑक्टो. १९९८, पृ. ४०) 'नवीन शोध लावणे' व 'लावलेले शोध पुनःपुन्हा लावणे' हे एकच होत असे बागूल वाचकांना येथे भासवू इच्छितात. नवीन शोध लावण्याचे काम रिसर्चप्रयोगशाळांमधून शास्त्रज्ञ करीत असतात, शाळा-कॉलेजमधील प्रयोगशाळांत विद्यार्थी प्रॅक्टिकल्स करतात, हे सुद्धा गळतग्यांना माहीत नाही असे बागूलांना सुचवायचे आहे! नव्हे, तसा स्पष्ट आरोप करून उलट मीच सत्यापलाप करतो असे ते उघड म्हणतात सुद्धा! उदा. त्यांचे हे पुढील विधान पाहा: "श्री. अद्वयानंद गळतगे यांनी.... प्रॅक्टिकल्सना शोध म्हणण्यात सत्यापलाप केला आहे." (पृ. ९९) पण मी प्रॅक्टिकल्सना कुठेच 'शोध' म्हटलेले नाही. म्हणजे मी न केलेले विधान मी केले आहे असे म्हणण्याचा पहिला अन्याय प्रथम माझ्यावर करायचा, आणि त्या अन्यायाच्या बळावर मला 'खोटारडे' म्हणण्याचा दुसरा अन्याय करायचा, असा हा दुहेरी अन्याय माझ्यावर करून स्वतः बागूल सत्यनिष्ठ म्हणून नामानिराळे राहू व मिरवू इच्छितात!

पुढे बागूल म्हणतात, "शाळा-कॉलेजमधील प्रयोगशाळांत विज्ञानात लागलेले शोध तपासून बघतात." (पृ. ९८) आता याला काय म्हणावे? 'शोध तपासून बघणे' हा काय प्रकार आहे? कारण विज्ञानात कधीच 'शोध तपासून बघत' नसतात.




अनुक्रमणिका





विज्ञानात सिद्धान्त तपासून बघत असतात. (Scientists test theories.) आणि शोध लावत असतात. (Scientists make discoveries.) 'तपासून बघणे' यासाठी विज्ञानात 'testing' असा खास शब्दप्रयोग करण्यात येतो. आणि testing हे फक्त theories चेच होऊ शकते. 'शोधा'चे (discovery चे) होऊ शकत नाही. शोधांना फक्त 'बळकटी' आणली जाते. (Discoveries are confirmed.) पण बागूलांच्या विज्ञानाचे जग काही औरच आहे. या जगात महत्वाचे शोध लावणाऱ्या जगातील मोठमोठ्या शास्त्रज्ञांवर शाळा-कॉलेजमधील विद्यार्थी 'तपासणीस' म्हणून काम करतात!

'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' या पातंजल योगसूत्राचा मी चुकीचा अर्थ केला आहे असे बागूल म्हणतात. (पृ. ९९) या सूत्राचा अर्थ मी 'मन ताब्यात ठेवण्याला योग म्हणतात' असा केला आहे. तो अर्थ रजनीशांच्या 'ठहरा हुआ मन' या कल्पनेशी विसंगत नाही. पतंजलींच्या मूळ सूत्रात 'निरोध' हा शब्द असून त्याचे check, control असे कोशात अर्थ दिले आहेत. (*Sanskrit-English Disctionary* - V.S. Apte) आपटे यांनी हे अर्थ देताना 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' ह्या सूत्राचेच उदाहरण दिले आहे. check व control यांचे अर्थ, अनुक्रमे, 'थांबवणे' व 'ताब्यात ठेवणे' असे आहेत. मन चंचल असल्यामुळे ते सतत इकडेतिकडे धावत असते. ते थांबवायचे झाल्यास त्याच्यावर प्रथम ताबा मिळवला पाहिजे. हे मी म्हणत नाही, तर स्वतः योगेश्वर श्रीकृष्ण यानेच गीतेच्या योगावरील सहाव्या अध्यायात म्हटले आहे. ज्या श्लोकात त्याने हे म्हटले आहे तो श्लोक असा : *'यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम्! ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्* ।।' (६.२६) म्हणजे, 'जिकडे जिकडे चंचल व अस्थिर मन धावेल तिकडून तिकडून त्याला ओढून आणून आपल्या ताब्यात ठेवावे (वशं नयेत्)'. कृष्णाचे हे म्हणणे 'ठहरा हुआ मन' म्हणजे (इकडे तिकडे धावण्यापासून) 'थांबलेले मन' या अर्थाने घेऊन 'चित्तवृत्तिनिरोध' याचा अर्थ 'ताब्यात ठेवलेले मन' असा करणे चुकीचे नाही. नव्हे तसाच तो अर्थ केला पाहिजे. कारण पतंजलींनी या नंतरच्या सूत्रात *'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्* ।' असे म्हटले आहे. येथे 'तदा' (म्हणजे 'तेव्हा') हा शब्द त्यांनी घेतला आहे, तो जाणून बुजून. कारण असे मन ताब्यात आल्यानंतरच 'द्रष्टुः' म्हणजे द्रष्ट्याची 'स्वरूपेऽवस्थानम्' म्हणजे 'आपल्या रूपात स्थिती' होते, म्हणजे 'द्रष्टा-दृश्य' हे द्वैत नाहीसे होऊन 'आत्मस्थिती' प्राप्त होते. अशा-वेळी – आणि अशाच वेळी – मन नष्ट झाले असे म्हणता येते. पतंजलींच्या पहिल्या ('योगश्चित्तवृत्तिनिरोधः' या) सूत्राच्या बाबतीत तसे म्हणता येत नाही. अन्यथा पतंजलींनी 'तदा' हे कालदर्शक अव्यय वापरले नसते व वेगळे दुसरे सूत्र लिहिले नसते. आणि हीच योग-प्रक्रिया (procedure) बरोबर आहे. कारण मन प्रथम आपल्या ताब्यात आल्याशिवाय आपण होऊन – आपोआप – ते नाहीसे कसे होईल? अशारीतीने पतंजलींनी योगातील प्रक्रिया वा अवस्था (मन ताब्यात ठेवून स्थिर करण्यासंबंधीची) पहिल्या सूत्रात वर्णिली असून मन नाहीसे होण्याची (आत्मस्थितीची) अवस्था वा प्रक्रिया दुसऱ्या सूत्रात वर्णिली आहे. (गीतेतही अशीच प्रक्रिया 'आरूरूक्षोर्मुने-र्योगं....' या श्लोकात दोन टप्प्यात वर्णिली आहे. ६.३) अशा रीतीने माझे पहिल्या ('योगश्चित्तवृत्तिनिरोधः' या) सूत्राचे 'मन ताब्यात ठेवण्याला योग म्हणतात' हे भाषांतर चुकीचे नाही हे स्पष्ट होईल.

बागूल म्हणतात. "गळतगे यांनी पुढच्या वाक्यात म्हटले आहे की, 'धर्मात मनाचा संबंध परमसत्तेशी जोडला जातो, असे रजनीश वरील उताऱ्यात म्हणतात. धर्माचा परमसत्तेशी संबंध असता तर सर्व धर्म टाकून देण्यास व परमात्म्यास (परमसत्तेस) शरण जाण्यास कृष्णाने सांगितले नसते.' या ठिकाणी गळतगे यांनी रजनीश यांच्या नांवावर खोटेच लिहिले आहे." (पृ. ९९) काय खोटे लिहिले आहे? तर, धार्मिक माणसाचे मनच नष्ट होते असे रजनीशांचे म्हणणे असताना मी "धर्मात मनाचा संबंध परमसत्तेशी जोडला जातो, असे रजनीश म्हणतात" असे म्हणतो, हे बागूलांच्या दृष्टीने खोटे आहे. कारण बागूल म्हणतात, "मनच नष्ट झाल्यावर त्याचा संबंध परमसत्तेशी कसा जोडला जाणार हा प्रश्न गळतगे यांना कसा पडला नाही?" (पृ. ९९) येथे बागूलांनी पहिला घोटाळा प्रश्न विचारण्यात केला आहे. वास्तविक 'परमसत्तेशी जेव्हा संबंध जोडला जातो तेव्हा मनच अस्तित्वात राहत नसताना (किंवा ते नष्ट झालेले असताना) ते गळतग्यांनी कुठून आणले?' अशा प्रश्न त्यांनी मला विचारायला हवा होता. त्यांनी वरील आपला प्रश्न विचारताना माझ्यावर जो सुप्त आरोप केला आहे की, "नष्ट झालेले मन परमसत्तेशी जोडले जाते" असे






मी म्हणतो, तोच मुळी खोटा आहे. कारण मी असे म्हटलेले नाही, तर खुद्द रजनीशांनीच असे म्हटले आहे. रजनीशांचे पुढील वाक्य पाहा : "क्योंकि मन जहां ठहरता है (नष्ट होता है – इति बागूल) वही तत्क्षण उस परमसत्तासे संबंध जुड जाता है।" (पृ. ९९) याचा अर्थ 'जेथे मन थांबते (बागूलांच्या भाषेत 'नष्ट होते') तेथेच, त्याच क्षणी त्या परमसत्तेशी संबंध जोडला जातो.' तेव्हा बागूलांनी मला विचारलेला प्रश्न वास्तविक त्यांनी रजनीशांना विचारायला पाहिजे! बागूलांना मला प्रश्न विचारायचा झाल्यास मी वर म्हटल्याप्रमाणे विचारायला पाहिजे. म्हणजे बागूलांना नीट प्रश्न विचारता येत नाही. याचे कारण या अध्यात्मशास्त्रातील संकल्पना त्यांच्या डोक्यावरून गेल्या आहेत! ते फक्त शब्दांचे बाह्यार्थ पाहतात. तेवढेच त्यांना येते.

त्यांनी मला प्रश्न विचारला आहे की, "मनच नष्ट झाल्यावर त्याचा संबंध परमसत्तेशी कसा जोडला जाईल हा प्रश्न गळतगे यांना कसा पडला नाही?" मला तो पडला नाही याचे कारण या विधानाशी, म्हणजे मन नष्ट झाल्यावर (आणि असे नष्ट झाल्यावरच) परमसत्तेशी संबंध जोडला जातो, या विधानाशी, मी पूर्ण सहमत आहे म्हणून! तेव्हा तो प्रश्न पडण्याचे कारण नाही. मग मी "धर्मात मनाचा संबंध परमसत्तेशी जोडला जातो असे रजनीश म्हणतात" असे का म्हटले? म्हणजे रजनीशांच्या संदर्भात विधान करताना मी 'मन' कुठून आणले? ते वरील रजनीशांच्या वाक्यातूनच उचलले आहे. त्यांच्या "मन जहां ठहरता है, वही तत्क्षण उस परमसत्तासे संबंध जुड जाता है" या विधानातील गौणवाक्यात 'मन' हा प्रथमांत कर्ता आहे. (म्हणजे तो कर्तरी प्रयोग आहे.) तर मुख्य वाक्य कर्मणि प्रयोगात असून त्यात कर्ता नाही. (अध्याहृत आहे.) म्हणून त्याचा अर्थ करताना रजनीशांच्या गौणवाक्यातील 'मन' हा कर्ता मी घेतला आहे. कारण व्याकरणाच्या नियमानुसार व रजनीशांच्या 'ठहरा हुआ मन' या संकल्पनेनुसार कर्ता तोच घेतला पाहिजे. म्हणून "धर्मात मनाचा संबंध' असे मी म्हटले आहे. बागूल मात्र व्याकरणाकडे दुर्लक्ष करून या ठिकाणी 'माणूस' हा बाहेरून कर्ता घेतात. 'माणूस' हा कर्ता बाहेरून का घ्यायचा? तर म्हणे रजनीशांच्या भाषणात 'आदमी' शब्द आला आहे म्हणून! (धार्मिक आदमी, अधार्मिक आदमी इ.) पण त्यामुळे काय फरक पडणार आहे? कारण परमसत्तेशी संबंध जोडला जातो, तेव्हा जेथे मनच राहत नाही तेथे 'आदमी' कसा राहणार? वास्तविक ती वाचातीत अवस्था आहे. शून्यावस्था आहे. तिचे वर्णनच करायचे झाल्यास 'आत्मस्थिती' किंवा 'ब्राह्मीस्थिती' असे करता येईल. पण बागूलांना यातले काही कळालेले नाही. कारण ते म्हणतात, "म्हणजे रजनीशांना माणूस म्हणायचा आहे हे लक्षात न घेता गळतगे त्या ठिकाणी माणूस शब्दाऐवजी मन शब्द घेऊन वाक्य तयार करतात की, 'धर्मात मनाचा संबंध परमसत्तेशी जोडला जातो.' गळतगे यांचा हा खटाटोप कसा सावरावा?" (पृ. ९९)

वर म्हटल्याप्रमाणे मी रजनीशांच्या मूळ वाक्यरचनेनुसार व रजनीशांच्या मुख्य प्रतिपादनानुसार 'मन' हा शब्द कर्ता घेतला आहे. रजनीशांचा आपल्या प्रवचनातील मुख्य रोख (gravamen) 'मना'वर आहे, 'माणसा'वर नाही. 'माणूस' तेथे उपरा असल्यामुळे तो बाहेरून आणणे हाच वास्तविक बागूलांचा खटाटोप असून तो कसा सावरावा हे त्यांचे त्यांनी बघून घ्यावे. खरी गोष्ट अर्थात् परमसत्तेचा आध्यात्मिक अर्थ बागूलांना अजीबात कळालेला नाही ही आहे. अन्यथा माणूस आणि मन यापैकी काय घेणे संदर्भोचित आहे हे त्यांना कळाले असते व हा व्यर्थ आक्षेप त्यांनी घेतला नसता.

या ठिकाणी जाताजाता एक गोष्ट सांगणे उचित होईल. रजनीशांनी 'परमसत्ते' विषयी बोलताना जे मिश्र वाक्य तयार केले आहे. त्यात गौण वाक्य 'मन' हा कर्ता घेऊन कर्तरी प्रयोगात ठेवले आहे, व मुख्य वाक्य (कर्ता न वापरता म्हणजे तो अध्याहृत ठेवून) कर्मणि प्रयोगात ठेवले आहे. आध्यात्मिक सत्य सांगण्याची रजनीशांची ही एक खुबी असून, ती त्यांनी कळत केलेली असो व न कळत केलेली असो, मोठीच औचित्यपूर्ण आहे यात शंका नाही. परमसत्तेशी कर्त्याचा (agent चा) काहीच संबंध नसतो, त्या ठिकाणी कर्ताच लुप्त होतो, आत्मा अकर्ता असल्यामुळे कर्त्याची भाषाच करता येत नाही, हे आध्यात्मिक सत्य येथे अशारीतीने रजनीशांनी वाक्यरचनेच्या खुबीने व्यक्तविले आहे; किंवा, त्यांच्या न कळत हे घडले असेल तर, त्यांच्याकडून आध्यात्मिक सत्य वाक्यरचनेच्या कौशल्याने सांगण्याचे औचित्य अभावितपणे साधले गेले आहे.

पुढे बागूल म्हणतात, "याच ठिकाणी गळतगे यांनी असेही म्हटले आहे की, 'धर्माचा परम सत्तेशी संबंध असता तर सर्व धर्म टाकून देण्यास व परमात्म्यास (परम सत्तेस) शरण जाण्यास कृष्णाने सांगितले नसते.' आता मात्र गळतगे यांनी कहर केला आहे. याआधीच्याच वाक्यात गळतगे यांनी म्हटले आहे की, 'धर्मात मनाचा संबंध परम सत्तेशी जोडला

जातो, असे रजनीश वरील उताऱ्यात म्हणतात,' आणि लगेचच म्हणतात की, 'धर्माचा परम सत्तेशी संबंध'. गळतगे यांनी नक्की काही तरी एक ठरवावे. परम सत्तेशी संबंध कोणाचा? मनाचा की धर्माचा? आधी म्हणायचे 'मनाचा' आणि नंतर लगेच म्हणायचे की, 'धर्माचा'. गळतगे हा खटाटोप करून रजनीशांची कोणती चूक दाखवू इच्छितात?" (पृ. ९९)

बागूलांचा हा सविस्तर उतारा देण्याचा उद्देश बागूलांची अध्यात्म हा विषय समजावून घेण्याची कुवत काय आहे याची वाचकांना कल्पना यावी, हा आहे. बागूलांनी उद्‌धृत केलेल्या माझ्या वरील अवतरणात 'सर्व धर्म टाकून देऊन परम सत्तेस शरण येण्यास' सांगणारे जे कृष्णवचन मी उद्‌धृत केले आहे, त्यात 'रूढ अर्थाचा धर्म टाकून देणे' हा अर्थ अभिप्रेत आहे. उलट रजनीश 'परम सत्ता' या अर्थाने 'धर्म' हा शब्द वापरतात. अर्थात् तो टाकून देण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. 'मन' टाकून देण्यास मात्र रजनीश वारंवार बजावतात. कारण मन टाकून दिले तरच, तत्क्षण परम सत्तेशी संबंध जोडला जातो. ('क्योंकि जहां मन ठहरता है वही तत्क्षण उस परम सत्तासे संबंध जुड जाता है।') यावरून श्रीकृष्ण ज्या अर्थाने 'धर्म'-टाकून देण्यास सांगतात, त्याच अर्थाने रजनीश 'मन' टाकून देण्यास सांगतात, हे उघड आहे. यावरून कृष्णाचा 'धर्म' व रजनीशांचे 'मन' एकच आहेत हे स्पष्ट होते. म्हणूनच मी एकदा (म्हणजे रजनीशांच्या संदर्भात) 'मन' हा शब्द वापरला आहे, व दुसऱ्यांदा (म्हणजे कृष्णाच्या संदर्भात) 'धर्म' हा शब्द वापरला आहे. वास्तविक बागूलांचा अध्यात्म हा विषयच नव्हे. त्यांना फक्त शब्दांचे खेळ खेळण्याची कला अवगत आहे. अशा गृहस्थांनी रजनीशांचे उतारे द्यावेत हा एक खरोखर मोठा विरोधाभास आहे.

लगेच पुढे ते म्हणतात, "याच ठिकाणी दुसरा खटाटोप पाहू." (पृ. ९९) 'सर्व धर्म टाकून देण्यास सांगणारे' कृष्णवचन मी उद्धृत केले, यालाच बागूल 'दुसरा खटाटोप' म्हणतात! हे वचन पुन्हा उद्धृत करून बागूल कृष्णाचे 'स्वधर्मे निधनं श्रेयः' हे दुसरे वचन उद्धृत करून गळतग्यांना विचारतात की, "स्वधर्मे या शब्दात धर्म शब्द आहेच ना? म्हणजे तो धर्म तरी कृष्णाने टाकून देण्यास नाही ना सांगितले, गळतगे?" (पृ. ९९) या दोन्ही कृष्णवचनात 'धर्म' हा शब्द आला असल्यामुळे प्रत्येक ठिकाणी 'धर्म' शब्दाचा कृष्णाला एकच अर्थ अभिप्रेत आहे की वेगळा याचा विचार करण्याची बागूलांना कसलीच गरज वाटत नाही. वास्तविक एका ठिकाणी धर्म टाकून देण्यास सांगणारा कृष्ण दुसऱ्या ठिकाणी धर्म टाकून देऊ नकोस असे जर म्हणत असेल तर दोन्ही ठिकाणच्या धर्माचा त्याचा अर्थ एकच नाही, वेगवेगळा आहे, हे स्पष्ट आहे. पण त्याचा विचार न करता बागूल उलट म्हणतात की गळतग्यांनी धर्म शब्दाची 'ओढाताण केली आहे'! (पृ. १००) तेव्हा मी काय ओढाताण केलेली नाही, हे आता मलाच स्पष्ट करून सांगितले पाहिजे. बागूलांनी जे नवे कृष्णवचन उद्धृत केले आहे, त्या 'स्वधर्मे निधनं श्रेयः' यात ज्या अर्थाने 'धर्मा'त मरणे श्रेयस्कर असे कृष्णाने म्हटले आहे, तो 'धर्म' शब्दाचा आध्यात्मिक अर्थ असून रजनीशांनी आपल्या प्रवचनात त्याच अर्थाने तो शब्द वापरलेला आहे. पण तो 'सर्वधर्मान् परित्यज्य' या दुसऱ्या कृष्णवचनातील 'धर्म' शब्दाच्या अर्थाच्या विरुद्ध आहे. या दुसऱ्या वचनातील 'धर्म' हा शब्द कृष्णाने आध्यात्मिक अर्थाने वापरलेला नाही, तर रूढार्थाने वापरलेला आहे. तो शब्द 'धर्मान्' असा बहुवचनात आहे. 'सर्व धर्म टाकून दे' असे जेव्हा कृष्ण अर्जुनाला सांगतो तेव्हा आध्यात्मिक अर्थाचा 'धर्म' टाकून दे असे तो सांगत नाही. (तो टाकून देण्याचा प्रश्नच नाही.) तर रूढार्थाचे 'धर्म' (जे अनेक असल्यामुळे त्यांच्यात 'द्वैत' – भांडण – निर्माण होते, उलट आध्यात्मिक अर्थाचा 'धर्म' एकच असल्यामुळे त्यात 'द्वैत' वा भांडण नसते) टाकून दे असे सांगतो. अशारीतीने या दोन वचनांत कृष्णाने 'धर्म' हा शब्द भिन्न – नव्हे परस्परविरुद्ध – अर्थाने वापरला आहे, हे स्पष्ट आहे. (बागूलांना एका ठिकाणी 'धर्म' एकवचनात का, व दुसऱ्या ठिकाणी तो बहुवचनात का याचासुद्धा विचार करावासा वाटलेला नाही!) पहिल्या वचनातील 'धर्म' हा शब्दार्थ रूढ नाही. तो शब्द तेथे आध्यात्मिक अर्थाने आला असून गीतेच्या म्हणजे अध्यात्मशास्त्राच्या संदर्भातच तो वापरला पाहिजे, आणि नेहमी वापरला जातो. म्हणून मी रजनीशांच्या प्रवचनात तो क्षम्य मानला आहे. कारण मी तेथे स्पष्ट म्हटले आहे की, "कारण रजनीशांनी आपला धर्माचा वेगळा अर्थ तेथे स्पष्ट केला आहे." (*नवभारत*, ऑक्टो. १९९८, पृ. ४२) 'तेथे' म्हणजे बागूल समजतात त्याप्रमाणे नुसतेच 'प्रवचना'त नव्हे तर 'आध्यात्मिक प्रवचनात'. (कारण रजनीशांची सर्व प्रवचने आध्यात्मिकच असतात.) अध्यात्मात तो अर्थ योग्य असल्याने मी क्षम्य म्हटले आहे. केवळ कुठल्या






तरी प्रवचनात आहे म्हणून क्षम्य म्हटलेले नाही. माझा आक्षेप रजनीशांच्या 'धर्म' शब्दाच्या वापराविषयी नाही. **माझा आक्षेप 'धर्म' शब्दाचा रजनीशांचा आध्यात्मिक अर्थ घेऊन रूढार्थाने तो शब्द वापरणाऱ्या दीक्षितांवर टीका करण्याला आहे.** बागूलांनी या ठिकाणी, साळुंख्यांच्या 'धर्म' शब्दाहून वेगळ्या अर्थाने दीक्षितांचे 'धर्म' शब्दाचे विवेचन आहे असे म्हणून, "कोणीही रूढार्थानेच 'धर्म' हा शब्द वापरतात" या माझ्या वाक्यातील 'कोणीही' मधून 'अमक्याला वगळ', 'तमक्याला वगळ' असे जे तारे तोडले आहेत ते शुद्ध अज्ञानातून. कारण साळुंखे आणि दीक्षित यांच्यातील 'धर्मा'बद्दलची चर्चा सामाजिक संदर्भातली आहे. उलट रजनीशांची 'धर्म' शब्दाची चर्चा शुद्ध आध्यात्मिक पातळीवरची आहे. वाद एकाच पातळीवर होऊ शकतो. भिन्न पातळीवरून नाही. बागूलांनी साळुंखे-दीक्षितांच्या चर्चेचा सामाजिक संदर्भ लक्षात न घेता रजनीशांचा आध्यात्मिक संदर्भ घेऊन टीका केली आहे. हे आक्षेपार्ह आहे.

पुढच्याच परिच्छेदात "तथापि ते त्यांच्या प्रवचनात क्षम्य मानता येईल" हे माझे (त्यांना न समजलेले) वाक्य उद्धृत करून बागूल विचारतात की, "मग रजनीशांना ही क्षम्यतेची सवलत गळतगे का देत आहेत? कारण त्यांना बागूलांना एकट्याला ठोकायचे आहे." (पृ. १०१) बागूलांना 'धर्म' शब्दाचे वेगवेगळे अर्थ दिसत नाहीत; त्यांचे वेगवेगळे संदर्भ दिसत नाहीत; रजनीशांच्या व साळुंखे-दीक्षितांच्या चर्चेच्या भिन्न पातळ्या दिसत नाहीत; 'धर्म' शब्दाचे त्यांचे भिन्न संदर्भमूल्य दिसत नाही; त्याना दिसते फक्त 'ठोकणे'! कारण, या 'धर्म' शब्दाच्या भिन्न स्तरावरील अर्थाचा विचार न करता दीक्षितांवर केलेल्या त्यांच्या टीकेला मी जो आक्षेप घेतला आहे, व त्यांचे दोष दाखवले आहेत, त्याचा त्यांना राग आहे. म्हणून ते अशी 'ठोकण्या'ची भाषा वरचेवर करतात!

बागूल अध्यात्मविषयात किती अडाणी आहेत याची कल्पना वाचकांना पुढील आणखी एका उदाहरणावरून येईल. बागूल म्हणतात, "रजनीशांनी वरील उताऱ्यात 'माणसाचा परम सत्तेशी संबंध' असे म्हटले आहे. 'धर्माचा परम सत्तेशी संबंध' असे मुळीच म्हटलेले नाही." "मग गळतगे यांनी परम सत्तासे म्हणजे (धर्मसे) असे लिहून परम सत्ता म्हणजे धर्म हा अर्थ रजनीशांच्या माथी का मारला आहे? असा खोटारडेपणा करणाऱ्या गळतगे यांचे लेखन अर्थपूर्ण म्हणायचे काय?" (पृ. १००, पहिले अवतरण पहिला स्तंभ, दुसरे अवतरण दुसरा स्तंभ.)

वरील पहिल्या अवतरणात 'रजनीशांनी माणसाचा परम सत्तेशी संबंध' म्हटल्याचे बागूल धडधडीत खोटे लिहितात. हा 'माणूस' वास्तविक बागूलांचा आहे, रजनीशांचा नाही. या अवतरणात बागूलांचा माझ्यावर आरोप आहे की 'माणूस' या शब्दाच्या ठिकाणी मी 'धर्म' हा शब्द वापरतो. या विषयीचे स्पष्टीकरण बागूलांचा 'माणूस', रजनीशांचे 'मन' व कृष्णाचा 'धर्म' यासंबंधीचे विवेचन करताना मी वर केलेच आहे. दुसऱ्या अवतरणात 'परम सत्ता' या शब्दाचा अर्थ 'धर्म' असा करून मी तो रजनीशांच्या माथी मारतो असा त्यांचा माझ्यावर आरोप आहे. वास्तविक रजनीशांच्या माथी हा अर्थ मी मारत नसून खुद्द रजनीशांनाच 'धर्म' शब्दाचा आध्यात्मिक दृष्टीने 'परम सत्ता' हा अर्थ अभिप्रेत आहे, हे त्यांचा उतारा वाचणाऱ्या कोणत्याही वाचकाच्या सहज लक्षात येईल. उदा. रजनीशांनी म्हटले आहे की, "अगर ठहरा हुआ मन है, तो वह आदमी धार्मिक है। क्योंकि जहां मन ठहरता है, वही तत्क्षण उस परम सत्तासे संबंध जुड जाता है।" आता रजनीशांच्या या वाक्यातील 'मन थांबलेला मनुष्य धार्मिक आहे" याचा अर्थ काय? याचा अर्थ 'मन थांबणे' हे धर्माचे प्रमुख लक्षण आहे असा होतो. आणि 'मन थांबताक्षणी परम सत्तेशी संबंध जोडला जातो' याचा अर्थ काय? याचा अर्थ 'मन थांबणे' हे 'परम सत्ते'चेही (आत्मस्थितीचेही) लक्षण आहे असा होतो. अशारीतीने 'मन थांबणे' हे धर्माचे व परम सत्तेचे असे दोन्हींचे लक्षण असल्यामुळे 'धर्म' व 'परम सत्ता' हे एकच आहेत असे ठरते. मग मी 'परम सत्ता म्हणजे धर्म हा अर्थ रजनीशांच्या माथी मारला आहे' असे बागूल कसे म्हणतात? त्यांच्यात अध्यात्माच्या प्राथमिक गोष्टी समजून घेण्याचीही कुवत नाही, हे यावरून स्पष्ट होते. याला केवळ बागूलांचे 'आध्यात्मिक अज्ञान' म्हणणेही अयोग्य आहे, कारण अज्ञान्याला (अडाण्याला) आपल्याला यातले काही कळत नाही हे तरी कळते, व (इच्छा असेल तर) तो ते समजून घेण्याचा प्रयत्न करतो, किंवा (इच्छा नसेल तर) हा आपला विषय नव्हे असे म्हणून तो त्या फंदात पडत नाही. पण बागूलांना आपल्याला (रजनीशांचे) अध्यात्म कळते असा भ्रम झालेला असून त्या भ्रमात ते इतरांचे बरोबर म्हणणेसुद्धा चुकीचे ठरविण्याचा – खऱ्याला खोटारडे म्हणण्याचा – खटाटोप, नव्हे अव्यापारेषु व्यापार,

करतात. याला काय म्हणावे? हे ते प्रामाणिकपणे करीत असतील तर तो त्यांचा निर्बुद्धपणा ठरतो, आणि अप्रामाणिकपणे करीत असतील तर, तो त्यांचा (रामदासस्वामींच्या शब्दात) 'पढतमूर्ख'पणा ठरतो.

जे मुळात 'अस्तित्वात नाही' ते 'असल्याचे' आपल्या हातचलाखीने 'दाखवून' देणाऱ्यांना कलेच्या क्षेत्रात 'जादूगार' म्हणतात. वाङ्मयीन टीका क्षेत्रात अशा लोकांना काय म्हणावे हे मला माहीत नाही. जादू बघणाऱ्यांना आपण फसवले जात आहोत हे माहीत असते. पण टीकालेख वाचणाऱ्या वाचकाची टीकाकार सत्य सांगण्यासाठी टीका करतो अशी भावना असते, व त्याच दृष्टीने तो टीकालेख वाचतो. पण टीकाकाराने भाषेच्या व मांडणीच्या कौशल्याने वाचकाला बुद्धिपुरःसर फसवले तर? दीक्षित आणि अर्जुनवाडकर यांच्या लेखावरील टीकेत वाचकांची अशीच फसवणूक झालेली आहे. माझ्या लेखावर टीका करतानाही वागूलांनी अशीच वाचकांची मांडणी- व शब्द-कौशल्याने फसवणूक केलेली आहे. (मी येथे ती उघड करून दाखवली नसती तर ती वाचकांच्या लक्षात आली असती काय?) माझा मूळ लेख न वाचलेल्या वाचकांना मी खोटारडे लेखन करतो असेच वाटले असते. त्यांच्या दुर्दैवाने सत्याची जागा भाषेचे व मांडणीचे कौशल्य कधीच घेऊ शकत नाही. दुःख एवढेच की अशा तथाकथित टीकालेखकांचे खरे स्वरूप 'वाङ्मयीन जादूगार' हे आहे हे त्यांच्या टीकालेखनातील पितळ उघड करून वाचकांपुढे ठेवण्यास कोणी पुढे येत नाहीत.

*अद्वयानंद गळतगे*
भोज, जि. बेळगाव, कर्नाटक

(टीप : हा विषय येथे संपविण्यात येत आहे. – संपादक)










अनुक्रमणिका








हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून मे.पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






